# नवभारत

जून २०१३



अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**- संपादक मंडळ**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६६ । अंक ८। जून २०१३
वैशाख/ज्येष्ठ शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## जून २०१३

## अनुक्रमणिका

# जागतिक सहजीवन कसे शक्य होईल?

बाबूराव चंदावार

**प्रस्तावना :**

सहजीवनाची अनिश्चितता घेऊनच जगाची परिस्थिती एका विशिष्ट वळणावर येऊन पोचलेली दिसते आहे. याची ओळख करून घ्यायला हवी. अर्थात, ती निश्चितच करून घेता येऊ शकेल, पण यातून परिस्थितीची भयानकता जाणवू शकेल. ती जाणवेल म्हणून तिच्याकडे पहायचेच नाही, असे मात्र ठरवता येत नाही व ठरवूही नये. कारण, गीतेच्या अकराव्या अध्यायातल्या भयावह विश्वरूप दर्शनासारखेच जरी वाटले, तरी ते दर्शन करून घेणे गरजेचे आहे. कारण, कदाचित यातूनच भयमुक्तीचा मार्ग सापडू शकेल, असे वाटते. म्हणूनच भयावहतेच्या तळाशी भयमुक्ती असते वा असू शकते, असे म्हणताही येईल! परिस्थितीतली भयावहता ही अविश्वासातूनच विणली जाते. कोळी विणतो तशीच ही जाळी असतात. भक्ष्य पकडण्यासाठी कोळी आपल्या लाळेतून जाळे विणतो. मनुष्य व मनुष्यसमूह आपल्या मोहांच्या क्षणांची लाळ ओतून स्वत:ला हवे ते साधण्याची वृत्ती बाळगतो. ही वृत्ती भ्रममूलक असते. म्हणून जाळी तुटल्यावर जशी कोळ्याला निराशा येते व या निराशेतच दुसरीकडे जाळी विणण्याकरिता तो निघून जातो, तशीच निराशा भ्रामकतेतून माणसाला व मनुष्यसमूहांना येत असते. म्हणून, नैराश्यातून आपल्याला हवे ते साधण्याच्या भ्रामक ठरू पाहणाऱ्या चळवळी मनुष्याच्या व मनुष्यसमूहांच्या वतीने होतच असतात. पण, यातूनच भयमुक्तीचा मार्ग शोधण्यासाठी प्रकाशाची किरणे दृष्टीस पडतात. स्वातंत्र्याच्या आकांक्षेतून घडून येणाऱ्या जगातल्या सर्वच चळवळी यातल्याच म्हणता येऊ शकल्या. तरी त्या सर्वच स्वातंत्र्याच्या लक्ष्याकडे नेणाऱ्याच असतात, असे म्हणता येत नाही. पण, स्वातंत्र्याच्या लक्ष्यापर्यंत पोचवण्याची ऊर्मी मात्र यातूनच येत असते! अशा ऊर्मींचा इतिहासच स्वातंत्र्याच्या चळवळीचा इतिहास आहे. यांतल्या नेमक्या काहीच फलदायी ठरतात किंवा ठरू शकतात. ज्या ऊर्मी फलदायी ठरत नाहीत त्या वाया गेलेल्या नसतात, तर नवी उमेद देणाऱ्याही असू शकतात.

**१. क्रांतीच्या संकल्पाची पूर्णता**

१९१७ साली झालेल्या रशियातल्या बोल्शेविक क्रांतीनेदेखील अशीच एक उमेद जगाला दिली होती. काहींना ती निष्फळतेच्या आवरणातीलच वाटली आहे पण निष्फळतेचे आवरण धगधगणाऱ्या निखाऱ्यावर जशी राख साचते, त्या प्रकारचे असते. म्हणून, जी राख साचलेली होती त्यावर चीनमध्ये घडून आलेल्या क्रांतीने फुंकर घातली व धगधगत्या निखाऱ्याचीच क्रांतीची नवी आवृत्ती निघू शकली. अशा अनेक आवृत्त्या आजवर निघाल्या. त्या सर्व क्रांतीचे नवसंस्करण करणाऱ्याच होत्या. यात ऊर्मी धगधगती राहू शकली होती. पण, क्रांतीचा संकल्प जसा पूर्णत्वाला जायला हवा होता, तसा तो जाऊ शकला नव्हता. याचे मुख्य कारण मानवीय निष्ठेचा झालेला व जाणवणारा अभाव होता. शोषणमुक्त व शासननिरपेक्ष सामाजिक रचना करणे हा क्रांतीचा संकल्प सोडला गेला होता. पण राजकीय सत्तापरिवर्तनातच तो दुर्लक्षित राहिला व कालांतराने विरूनही गेला. म्हणून, यात फक्त खांदेपालट होऊ शकले. क्रांतीची ऊर्मी मात्र शिल्लक उरलीच होती. यातून नवउन्मेषशाली प्रकाशाची किरणे बाहेर पडली. ती भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीत प्रकाशमान झाली. बोल्शेविक क्रांती वाया गेली, असे कोणीही म्हणत नाहीत व म्हणूही नये. कारण, चीनमध्ये त्याचे नवसंस्करण निघू शकले व ते प्रभावीही ठरले. पण, क्रांतीच्या उद्देशपूर्ततेची आशा त्यातून अंकुरित होऊ शकली नाही. ती अंकुरित होऊ शकणार नाही, याचा संकेत महात्मा गांधींनी मानवेंद्रनाय रॉय यांना उत्तरादाखल लिहिलेल्या पत्रात दिलाच होता. क्रांतीच्या चिनी संस्करणात तो लक्षात घेतला गेला नाही. तो लक्षात घ्यायला हवा होता. कारण, यामुळे क्रांतीच्या उद्देशपूर्तीकडे जाण्याचा मार्ग सुकर होऊ शकला असता. पण, बोल्शेविक






क्रांतीच्या बाबतीत महात्मा गांधींनी जो अभिप्राय दिला होता, त्यातून नव्या ऊर्मीची किरणे निघू लागली होती. ही किरणे सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा प्रकाश उजळू शकली होती. यातून कम्युनिष्ट क्रांतीच्या बोल्शेविझमला जसे नाकारले गेले होते, तसेच भांडवलशाहीलाही नाकारले गेले होते. म्हणून, भारतीय स्वातंत्र्यचळवळीतल्या सत्याग्रहाचा नवा उन्मेषशाली झोत जगावर पाडला गेला होता. तो क्रांतीच्या भूमिकेचा अर्थ बदलून क्रांतीला नवा अर्थ प्रदान करू शकला नव्हता. तो अर्थ बोल्शेविक क्रांतीत तसेच चीनच्या क्रांतीत मानवीय निष्ठेच्या अभावांमुळे झळाळू शकला होता. भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीतच तो झळाळू शकला नव्हता. अर्थात, तो रशिया आणि चीनच्या दिशेहून वेगळा, विपरीत दिशेतलाच मानला गेला. म्हणून तो कम्युनिझमला नाकारणारा मानला गेला. तरीही तो भांडवलशाहीला नाकारणाराच होता! याचे भान न ठेवता केवळ कम्युनिझमला नाकारणारा मानूनच त्याची प्रसिद्धी केली गेली. भांडवलशाहीने रचलेल्या व्यूहाचा हा परिणाम होता. या दृष्टीने याकडे पाहिलेच गेलेले नव्हते. तसे पाहिलेच जाऊ नये याची तजवीज भांडवलशाहीने व तिच्या समर्थकांनी केली होती. पण, यामुळे कम्युनिझमला विरोध व भांडवलशाहीला समर्थन असा विपरीत भाव निघू लागला. तो भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीत सत्याग्रही तत्त्वज्ञानाचे जे अधिष्ठान निर्माण झाले होते, त्याला छेद देणाराच ठरला. म्हणून, सत्याग्रही तत्त्वज्ञानात स्वातंत्र्याचे जे पावित्र्य मानले गेले होते, तेच डागळून गेले. ते डागळावे हाच भांडवशाहीचा उद्देश होता! पण, हे लक्षात घेतले गेले नाही. म्हणून, सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा विकास साधण्यास अडथळा निर्माण झाला व हा अडथळा भांडवलशाहीच्या पथ्यावर पडला. कम्युनिझमच्या तत्त्वज्ञानाला पर्याय मानूनच सत्याग्रही तत्त्वज्ञानाकडे पाहिले गेले, अजूनही ते तसेच पाहिले जाते आहे. पण, क्रांतीच्या विकासप्रक्रियेतच सत्याग्रही तत्त्वज्ञानाकडे पाहिले जाणे गरजेचे होते. कम्युनिझमने मानवीय निष्ठेची बांधिलकी मानायला हवी, हे सत्याग्रही तत्त्वज्ञानाला अभिप्रेत होते, म्हणून ते कम्युनिझमच्या विरोधातले मानणे सर्वस्वी चुकीचेच होते. पण, ही चूक केली गेली. कारण, भांडवलशाहीत ही चूक तिच्या संरक्षणाचे कवच आहे, असेच मानले गेले. कम्युनिझमला मानणाऱ्यांनी याची जी प्रतिक्रिया करून घेतली, तीही सावधगिरीतली नव्हती. कारण, तत्त्वज्ञानाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन विरोधातलाच ठेवला. यात दूरदृष्टीचा संपूर्ण अभाव असलेलाच प्रत्ययास आला. भांडवलशाहीला हेच हवे होते. हे जरी काही असले, तरी क्रांतीच्या भूमिकेचा विकास करणे सत्याग्रही तत्त्वज्ञानाला अभिप्रेत होते व आहे, हे कोणत्याच परिस्थितीत नाकारता येत नाही व नाकारूही नये. या बाबतीत कम्युनिष्ट बेसावध राहिले व अजूनही ते बेसावधच आहेत!

बोल्शेविक क्रांतीची उद्देशपूर्ती होऊ शकली नाही. चीनमधल्या क्रांतीच्या नवसंस्करणातही या उद्देशपूर्तीची लक्षणे दिसली नाहीत. म्हणून, महात्मा गांधींच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानाचे महत्त्व उजळून निघाले. ते भारताच्या स्वातंत्र्याचे राजकीय फलित पदरात पाडून घेतल्यामुळे यशस्वी झाल्यासारखे वाटले. पण, स्वातंत्र्याला अभिप्रेत होते ते भारताच्या राजकीय स्वातंत्र्यात घडूही शकले नाही. हे भारतीय स्वातंत्र्याचे अपयश म्हणता येणार नाही व म्हणूही नये; पण ती एक अतिमहत्त्वाची उणीव म्हणता येईल. कारण, ही उणीव हा भारताचे स्वातंत्र्य खऱ्या अर्थाने स्थापित करण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा अडथळा ठरलेला आहे. तो दूर करून पुढे जाणे अद्याप शक्य होताना दिसत नाही. म्हणून, या उणिवेला स्वातंत्र्याच्या चळवळीचे अपयश मानून दूषणही दिले जाते आहे. हे दूषण ज्या कोणत्या हेतूने दिले जाते, त्याचा योग्य तो उलगडा करून घ्यायला हवा. पण, तो उलगडा अद्याप करून घेता आलेला नाही. स्वातंत्र्याचा योग्य तो अर्थ लावण्यासाठी जे काही गृहीत धरणे गरजेचे मानले जाईल, ते नेमके काय असेल व आहे, हे मात्र स्पष्ट करून घ्यायला हवेच आहे. अर्थातच हे साधार स्पष्ट करून घेता येऊ शकेल. कारण हे स्पष्ट करून घेता येण्यासारखे नक्कीच आहे!

### २. फरक : संस्कार आणि स्वभावातला

भारताच्या स्वातंत्र्यचळवळीचे यशापयश भारतापुरतेच महत्त्वाचे मानता येत नाही व मानूही नये. कारण, शोषणरहित शासननिरपेक्ष समाजरचना घडणे ही भारताचीच नव्हे, तर जगाचीही गरज आहे, आणि हे

क्रांतीच्या भूमिकेतलेच आहे. भारतात या दृष्टीने यश संपादन करता आल्यास जगातच यश संपादन करणे कदाचित सुकर होईल व शक्यही होईल.म्हणून, शोषणाची परिस्थिती व शासनाची जाचकता या दोन्ही परस्पर-पूरक तसेच पोषकच असल्यामुळे शोषण-शासन या दोन्हींचा एकत्रित विचार करणे गरजेचे होऊन बसते. म्हणून शोषणरहित व शासननिरपेक्षतेतच स्वातंत्र्य आहे, हे का मानायचे यावरच प्रथम विचार करायला हवा. या दृष्टीने स्वातंत्र्याची संकल्पना अद्याप सुस्पष्ट होऊ शकलेली नाही. कदाचित ती सुस्पष्ट होऊ शकणारही नाही. कारण, स्वातंत्र्याचा विचार सर्वसामान्यपणे स्वातंत्र्यामुळे येणाऱ्या व येऊ शकणाऱ्या जबाबदाऱ्या टाळून वा त्या वेगळ्या करूनच केला जातो. म्हणजे स्वातंत्र्याबरोबरच जबाबदाऱ्याही येतात याची कल्पना करण्याचे टाळले जाते व याचे भानही ठेवले जात नाही. हे असे का व्हावे हा प्रश्न उपस्थित होतो व तो तसा जुनाच म्हणायलाही हवा ! कारण, तो ज्या मानसिकतेतून निर्माण होतो, ती मानसिकता यावर विचार करण्याची नसते. विचार करू शकण्याची मानसिकता उपलब्ध नसली तर वैचारिक पात्रता प्राप्त करण्याची गरजच वाटत नाही. म्हणून, प्रश्न विचार करण्याची पात्रता निर्माण करण्याचा व ती जोपासण्याचाही आहे. पण ही पात्रता संपादन करता यावी, असे ज्या कारणास्तव वाटत नसेल, ते कारण शोधून पाहिल्यास लक्षात येते, की माणसामध्ये जी स्वामित्वाची भावना असते, ती सतत जागृत ठेवली गेली तर विचार करण्याची पात्रता यावी हे, संस्काराने असेल किंवा परंपरा जपण्याच्या वृत्तीमुळे असेल, वाटतच नाही. तेव्हा, 'स्वामित्वभाव' हा विचार प्रक्रिया चालवण्यास अनुकूल नसतो किंवा विचारच नाकारला जातो, हेच यातून सिद्ध होत असते. अर्थात, विचार करण्याची पात्रता माणसाला यावी हेच माणसातला 'स्वामित्वभाव' नाकारत आलेला आहे, हे लक्षात घ्यायला हवे. म्हणून विचार नाकारणे हे परंपरेतून आलेल्या व जोपासलेल्या संस्कारांचे फलित असते, हेदेखील लक्षात घ्यायला हवे ! तेव्हा, 'स्वामित्वभाव' हाच शोषण आणि शासनाच्या मुळाशी असतो, हे लक्षात घेऊनच 'स्वामित्वभाव' जपणाऱ्या संस्कारांचा, परंपरांचा विचार करता येऊ शकतो व तो करायलाही हवाच. संस्कार परंपरेतूनच येतात व येऊ शकतात. म्हणून, परंपरांचे विच्छेदन करूनच चांगल्या परंपरा व वाईट परंपरा असे पृथक्करण केले जाते. पण, चांगल्या परंपरा व वाईट परंपरा असा भेद करून नेमके काय साधायचे असते, हे फारसे उलगडत नाही. कारण, परंपरा या कालसापेक्षच असतात. एखादी परंपरा ज्या काळातली असते, ती बदललेल्या काळात नकोशीही होत नसते. म्हणूनच परंपरा चालवण्याचा संस्कार केला जातो व तो संस्कार करतच राहावे लागेल ! अर्थात, परंपरा चालवीत ठेवण्याचा संस्कारच महत्त्वाचा ठरतो. म्हणून, यात चांगले काय व वाईट काय या दोहोतून कोणाचीही निवड करण्यास संस्कार संधीच देत नसतो. अर्थात, संस्कारांचे संरक्षण-संवर्धन करून माणसाच्या चित्तावर ते ठसवत जाण्यासच महत्त्व येते व यामुळे परंपरेतील कालसापेक्षता उरत नाही व उरवली जातही नाही. यातून इष्टानिष्ट परंपरांचा विचार करण्याचे प्रयोजनच उरत उरत नाही. म्हणून परंपरा कालातीत ठेवली जाते ! तेव्हा, अशा कालातीत परंपरांना इष्टानिष्ट असे काहीच नसते. यामुळे जी परंपरा संस्कारांच्या बळावर कायमस्वरूपी ठेवली जाते, त्या परंपरेतून 'स्वामित्वभाव' जोपासला जाणेच स्वाभाविक असते. म्हणूनच 'स्वामित्वभाव' माणसाच्या चित्तात ठसवून जोपासला जातोच आहे.

माणसाची अभिव्यक्ती संस्कारातली असून चालत नाही. कारण, माणसाला स्वतःचा 'स्वभाव' आहे. 'संस्कार' आणि 'स्वभाव' या दोहोंत फरक करायला हवा. कारण, स्वभाव माणसाचा असतो आणि संस्कार कोणीतरी म्हणजे बाहेरच्याने दिलेला असतो. यात परंपराही आहेच; म्हणून परंपरांचे संस्कार असे म्हटलेही जाते. पण माणसाचा 'स्वभाव' याहून वेगळा आणि स्वतंत्र आहे. त्यावर संस्कारांचे पापुद्रे चढवले जातात. म्हणून, स्वतःच्या 'स्वभावाने' व्यक्त होण्यासाठी माणसाला त्याच्यावर झालेल्या संस्कारांचे पापुद्रे काढावेच लागतात. माणूस स्वभावाने व्यक्त होतो, तेव्हा तो माणूसच असतो. संस्कारातून व्यक्त होतो, तेव्हा त्याची अभिव्यक्ती संस्कारातली असते. यात संस्काराने माणसाचा स्वभाव






झाकला जातो. कारण, माणूस स्वभावाने व्यक्त होत राहावा, हेच संस्कारांना मान्य होत नसते. यातून 'स्वभाव' आणि 'संस्कार' ओळखायचे कसे, हा प्रश्न उपस्थित होतो. माणूस स्वभावतः प्रेमळ आहे. सृष्टीच्या रचनेत प्रेमळपणा हाच गुण आहे. एखादा माणूस अपघातात सापडतो, तेव्हा त्या व्यक्तीशी परिचय नसलेला कोणीही अपघात पाहून हळहळतो, त्याला अपार दुःख होत असते. यातून माणसाचा 'स्वभाव' व्यक्त होतो. अपघात पाहून 'हे नेहमीचेच आहे' म्हणून त्याकडे दुर्लक्ष केले जाते व तटस्थपणा स्वीकारला जातो, तेव्हा तो 'संस्कार' असतो. माणसाचा प्रेमळपणा हा सृष्टीत जोडून ठेवण्याचे तत्त्व आहे त्यातला असतो. तो अर्थातच निसर्गतःच असतो व आहे. तटस्थपणा बाळगण्यात रूक्षता आहे. ही रूक्षताच माणसाला माणसापासून तोडण्याची भूमिका घेत असते. म्हणून, जोडण्याची भूमिका प्रेमाच्या लक्षणातून येत असते व घडतही असते. रूक्षतेची लक्षणे तोडण्याची भूमिका घेत असतात. तेव्हा, माणसाच्या 'स्वभावा'वर 'संस्कारा'चे वर्चस्व निर्माण होऊ नये, ते होता कामा नये. कारण, यामुळे माणूस रूक्ष होईलच व त्याचा प्रेमळपणाही नाहीसा होईल. प्रेमाचा 'संस्कार' नसतो, फक्त 'भाव' असतो. म्हणून, 'प्रेमभाव' जसा आहे तसा 'संस्कार' नाही. कारण, संस्काराला मुळात 'भाव'च नसतो व नाही. या दृष्टीने विचार केल्यास माणसाने स्वतःच्या स्वभावातूनच अभिव्यक्त होणे गरजेचे असते. कारण, यातूनच 'प्रेमाचे प्रक्षेपण' होत असते. माणूस संस्कारातूनच व्यक्त होत राहिल्यास व त्यातच घडत गेल्यास निसर्गतः त्याच्यात असलेला 'प्रेमभाव' नाहीसा होईल. यामुळे संस्कारातली औपचारिकताच त्याच्यात शिल्लक उरेल!

### ३. निराशेच्या अंधारातून आशेचे किरण दिसतात

सध्याच्या जगात औपचारिकतेलाच महत्त्व आलेले आहे. म्हणजे व्यक्तींच्या संबंधातला प्रेमाचा सहजभाव अभावानेच दिसतो. निखाऱ्यावर राख साचावी तशी औपचारिकतेची राख व्यक्तींच्या प्रेमसंबंधांवर साचत चाललेली आहे. ज्याला व्यवस्था म्हणूनच संबोधिले जाते, ती औपचारिकतेच्या राखेसारखीच झालेली दिसते आहे. कारण, व्यवस्था संस्कारातून आलेल्या रूक्षतेतलीच असते. म्हणूनच व्यवस्थेत मनुष्यसंबंध कायद्याचे केले जातात. 'प्रेमभावा'तल्या विश्वासाचे ते केलेच जात नाहीत. कारण, व्यवस्थेच्या रूक्षपणामुळे 'प्रेमभावा'तला विश्वास जतन करता येत नाही व ते शक्य होतही नाही!

क्रांतीनंतरचे स्वातंत्र्य असो किंवा सत्याग्रहातून येऊ शकणारे व आलेले राजकीय स्वातंत्र्य असो; या दोहोंचे यश म्हणून काही सकृद्दर्शनी दिसत नाही. कारण, क्रांती आणि सत्याग्रह या दोहोंचा परिणाम त्यांनी स्वीकारलेल्या व्यवस्थेतच केंद्रित झाल्यामुळे व्यवस्थेचा गुणदोष त्यांना चिकटलेला असतो. म्हणून, व्यवस्थेतून जे येऊ शकते वा होऊ शकते, तेच क्रांतीला व सत्याग्रहाला अभिप्रेत असलेले नसते! म्हणून, क्रांती वा सत्याग्रह व्यवस्थेत जाऊन औपचारिकतेच्या तुरुंगात बंदिस्त होत असतात, याचा प्रत्यय येत असतो. यातूनच व्यवस्थेतला रूक्षपणा, जो कायद्याच्या शृंखलाबद्धतेतूनच अभिव्यक्त होतो, तो माणसांना त्यांच्या मानवीय प्रेमभावापासून वंचित करून ठेवतो. म्हणून, क्रांतीची व सत्याग्रहाची उद्दिष्टे पोरकी होतात! यांचा सांभाळ व विकास होत नाही. व्यवस्थेच्या रूक्षतेचा हा स्वाभाविक परिणामच म्हणायला हवा. म्हणून, क्रांती वा सत्याग्रहा- नंतरची परिस्थिती स्वातंत्र्यानुरूप ठेवण्याचा प्रश्न उपस्थित होतो व तो रशिया-चीनच्या क्रांतीनंतर व भारताच्या सत्याग्रहातून अस्तित्वात आलेल्या स्वातंत्र्यानंतरही निर्माण झाला व त्याचे समाधान देऊ शकणारे उत्तर शोधलेही जाते आहे! पण, समाधान देऊ शकणारे उत्तर मिळते आहे किंवा काय, याविषयी योग्य ते ठरवता यायला हवे. या दृष्टीने जागरूक राहण्याची व जागरूकता आणण्याची आवश्यकता आहे. याची परिस्थिती या वेळी नेमकी कशी आहे, हे जाणून घ्यायला हवे.

अजूनतरी रशिया-चीनच्या क्रांतीनंतरची परिस्थिती (अमेरिकी) साम्राज्यवादाच्या प्रतिक्रियेतच वावरताना दिसते आहे. म्हणून, साम्राज्यवादाच्या भयातून रशिया व चीनची धोरणे मार्गक्रमण करताना दिसतात. यामुळे क्रांतीच्या संदर्भात जो निर्भयपण अपेक्षित होता व आहे, तो रशिया-चीनमध्ये दिसून येत नाही. म्हणून, अमेरिकेच्या तुलनेत स्वतःची विशिष्टता जपण्यात रशिया व चीन अडकून पडलेले दिसतात. यात रशिया भौगोलिक दृष्ट्या

विघटनप्रक्रियेत आल्यामुळे तो स्वतःचा जागतिक महाशक्तीचा सन्मान गमावून बसलेला आहे. चीन मात्र जागतिक महाशक्तीच्या सन्मानानिकट जाऊन पोचलेला दिसतो आहे. त्याचा पोलादी पडदा जसा रशियाचा पोलादी पडदा फाटला तसा अद्यापतरी फाटलेला नाही. म्हणून हुकूमशाहीची परिणामकरता तो टिकवून आहे. पण, हुकूमशाहीची प्रतिक्रिया होऊन चीनचा पोलादी पडदादेखील फाटू शकतो. कारण, हुकूमशाहीच्या प्रतिक्रियेतून हेच घडत असते, घडत आलेलेही आहे. म्हणून, चीनदेखील तिथली प्रादेशिकता तीव्र वा प्रखर होत गेल्यास विघटनप्रक्रियेत येऊ शकतो. म्हणजे रशियासारखीच चीनचीही स्थिती होऊ शकते. भारताने राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करूनच जरी संसदीय लोकशाहीचा स्वीकार केलेला असला, तरी याच्या एकूण व्यवस्थेची औपचारिकता स्वतःच्या अंतर्विरोधामुळे अव्यवस्था पसरवीत आहे. म्हणून, संसदीय लोकशाहीची व्यवस्था सुकरतेने चालू शकत नाही. म्हणून, याचा अतिरेक झाल्यास भारतात जो मुळातच प्रादेशिकवाद उपस्थित आहे; तो प्रखर, होत जाईल. भारताच्या फाळणीतून स्वतंत्र पाकिस्तान निर्माण झाल्यामुळे तो खंडित झाला. त्याच्या दुष्परिणामांना तोंड द्यावे लागते आहे. पाकिस्तानचीही फाळणी होऊन स्वतंत्र बांगलादेश निर्माण झाल्यामुळे तर भारत-विभाजनाच्या परिस्थितीतल्या तीव्रतेत भर पडलेली आहे. ही सर्वच एकूण परिस्थिती रशिया-चीन-भारत या तीनही राष्ट्रांच्या क्रांत्यांना व सत्याग्रहातून प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याच्या भूमिकेला आव्हान देणारीच म्हणता येतील. असे जरी असले, तरी क्रांती आणि सत्याग्रहाचे महत्त्व कमी केले जाऊ शकत नाही व ते महत्त्व कमी होऊही शकणार नाही. कारण, क्रांतीतून येणारे अथवा सत्याग्रहातून येणारे स्वातंत्र्य जगाचे उज्ज्वल भविष्य घडवण्याच्या संकल्पातलेच मुळात असल्यामुळे, या संकल्पाला अपयशातूनही पुढे जातच राहावे लागणार आहे. म्हणून, क्रांती व स्वातंत्र्याच्या भूमिकांचे यथायोग्य सिंहावलोकन करून यांची पुनर्मांडणी करावी लागणार आहे. याचेच संकेत जागतिक पातळीवर ज्या तऱ्हेची अस्वस्थता दिसून येते आहे, त्यातून मिळत आहेत. म्हणून, क्रांती आणि सत्याग्रहातून येणाऱ्या स्वातंत्र्याच्या संकल्पनांची पुनर्मांडणी करणेही गरजेचे होऊन बसलेले आहे ! कारण, दोन जागतिक महायुद्धे घडून आल्यानंतर मूलभूत परिवर्तनाची एक दिशा जगाने धरली होती. पण, ती 'अडथळ्याची शर्यत' होत असल्यामुळे पुन्हा एक जागतिक महायुद्ध घडते किंवा काय, असे वाटू लागले आहे. यामुळेच असेल कदाचित, तिसऱ्या जागतिक महायुद्धाची कल्पनाही चीनचा क्रांतिकारक राष्ट्रनिर्माता माओत्से तुंग याने आधीपासूनच करून ठेवलेली आहे ! पण ही कल्पना माओला अगतिकतेतूनच सुचलेली असावी, असे वाटते. कारण, क्रांतीच्या भूमिकेचे योग्य ते परिपालन करता येऊ शकलेले नाही म्हणूनही ही अगतिकता निर्माण झाली असावी, असेही वाटतेच ! माओला पुरेशा प्रमाणात आकलनात आलेलेच नसावे, असेही म्हणता येईल. भारतीय स्वातंत्र्याच्या बाबतीत तर राजकीय स्वातंत्र्यातच हुरळून जाण्याची परिस्थिती भारतात निर्माण झाल्यामुळे भारताच्या स्वातंत्र्योत्तर नव-समाजरचनेच्या संदर्भात ती इतकी निरुपयोगी ठरली, की राजकीय स्वातंत्र्य निरर्थकच ठरले असावे, असेच वाटू लागले ! पण, यात ज्या एका नैराश्याने गाठल्यासारखे झालेले दिसते आहे, त्याचाच तो अपरिहार्य परिणाम म्हणायला हवा. म्हणून, क्रांती आणि स्वातंत्र्याच्या चळवळींची एक निरंतर प्रक्रिया असते व ती सतत चालवतही राहावी लागते, याचे भान महात्मा गांधींनी ठेवलेच होते. पण, पुढची दिशा स्पष्ट करण्यासाठी त्यांना आयुष्य लाभले नव्हते. अर्थात, त्यांच्या अनुपस्थितीत विनोबा व जयप्रकाश या दोघांनी क्रांतीच्या व स्वातंत्र्याच्या निरंतरतेचे भान ठेवले होते व त्यांनी त्या दिशेने पावलेही उचलली होती. ती अपेक्षेप्रमाणे यशस्वी ठरलेली नाहीत, ही एक वस्तुस्थिती आहे. पण, क्रांती अथवा स्वातंत्र्याची ठरीव अशी यशस्विता म्हणून काही मुळातच नसते; ती एक प्रक्रियाच असते व असू शकते. प्रक्रिया चालवताना यशापयश महत्त्वाचे मानले जात नाही. प्रक्रियेचे सातत्य टिकवून धरणेच तेवढे महत्त्वाचे मानले जाते. या दृष्टीने विचार करता लक्षात येईल, की निराश होण्यासारखी परिस्थिती निश्चितच नाही. कारण, निराशेच्या अंधारातूनच उजेड देणारा आशेचा सूर्य उगवत असतो. म्हणून, अंधारात चाचपडत चालताना आशेच्या प्रकाशाची किरणे दृष्टीस पडू शकतील, याचा विश्वास बाळगायला हवा !








### ४. साम्राज्यवाद व विस्तारवाद

क्रांतीच्या आणि स्वातंत्र्याच्या यशापयशाविषयी ज्या परिस्थितीत बोलावे लागते आहे, ती परिस्थिती नेमकी काय आहे, हे लक्षात घ्यायला हवे. व्यवस्थेतली औपचारिकता क्रांती व स्वातंत्र्याच्या भूमिकेशी समरस होणारी नसते. कारण, ती स्वतःच्या अस्तित्वाबाबतीत साशंक असते. म्हणून, अस्तित्वरक्षणासाठी ती तिची संघटित शक्ती प्रस्तुत करू लागते. ही व्यवस्थेची औपचारिकता शक्ती संपादन करण्यासाठी राष्ट्रवादातच स्वतःचे अस्तित्व शिल्लक राहू शकेल, असेच मानतही असते म्हणून व्यवस्थेतली औपचारिकता राष्ट्रवादाच्या संरक्षणात जातही असते व यातूनच तिला राष्ट्रवादाचा संस्कार जडत असतो. क्रांतीनंतर व राजकीय स्वातंत्र्यानंतर राष्ट्राच्या सीमेत राष्ट्राला स्थैर्य देण्यासाठी राष्ट्रवादाचा पुरस्कार केला जातो. तो जेव्हा प्रभावी होऊ लागतो, तेव्हा त्यातूनच क्रांती व स्वातंत्र्याच्या भूमिकेवर स्वतःचे वर्चस्व गाजवीत राहण्यास राष्ट्रवाद यशस्वी होऊ लागतो. म्हणून, क्रांतीनंतर व स्वातंत्र्यानंतरही व्यवस्थेची औपचारिकता राष्ट्रवाद धारण करते व राष्ट्र तसेच राष्ट्रवाद दोन्ही महत्त्वाला चढत असतात. यामुळे क्रांतीची व स्वातंत्र्याची भूमिका मागे पडून त्यावर राष्ट्रवादाची झिंग चढल्यामुळे क्रांतीचे व स्वातंत्र्याचे फलित म्हणून काहीही अस्तित्वात येत नसते. कारण, राष्ट्रवादी झिंग ही आक्रमक असते व ती तशीच असू शकते. तेव्हा, क्रांतीनंतर व स्वातंत्र्यानंतरही व्यवस्थेच्या औपचारिकतेतून ज्या राष्ट्रवादाचे पाश आवळले जातात, स्वीकारले जातात, त्यातूनच राष्ट्रवाद आक्रमक होत असतो! हीच क्रांतीनंतरची व स्वातंत्र्यानंतरची परिस्थिती रशिया, चीन व भारताची झालेली आहे. यामुळे क्रांतीने व स्वातंत्र्याने राष्ट्रवादाचा पुरस्कार करावा काय? असा प्रश्न उपस्थित केला जातो आहे. कारण, कोणताही राष्ट्रवाद मुळात आक्रमकच असतो व म्हणून तो विस्तारवादी होत असतो व होऊ शकतो. रशिया-चीन-भारत या तीनही राष्ट्रांच्या बाबतीत काय म्हणता येण्यासारखे आहे, यावर विचार करायला हवा. शोषणाच्या प्रक्रियेतूनच भांडवलशाही निपजत असल्यामुळे ती स्वतःचे साम्राज्य निर्माण करू पाहते व करतेही. म्हणून, साम्राज्यवादाचे आक्रमक स्वरूप अमेरिकेसारख्या भांडवलशाहीचा पुरस्कार करणाऱ्या राष्ट्रामधून स्पष्टच दिसून येते आहे. यामुळे अमेरिकेची झालेली आक्रमक प्रवृत्ती वेळोवेळी अनेक प्रसंगांतून स्पष्ट झालेली आहे. पण, रशिया आणि चीनदेखील राष्ट्रवादाचा पुरस्कार करूनच विस्तारवादी होतात, हेदेखील लक्षात घ्यायला हवे! रशियाने स्वतःचा भौगोलिक विस्तार ज्या पद्धतीने केला होता, त्याची प्रतिक्रिया होऊनच विघटनाची प्रक्रिया रशियात निर्माण झाली व रशियात प्रादेशिकवाद बळावत गेल्यामुळे रशियाचे विघटनही झालेले आहे. हेच आतापर्यंत तरी चीनचे झालेले नाही! पण, चीनने स्वीकारलेला राष्ट्रवाद हा विस्तारवादीच आहे. भारताला त्याच्या उत्तरसीमेच्या परिस्थितीमुळे हे प्रत्ययास येतच आहे! कारण, माओने कम्युनिझमच्या जागतिक विस्तारासाठी आक्रमकता स्वीकारूनच शेजारी राष्ट्रांच्या सीमा पुसून टाकण्याच्या हेतूने जागतिक कम्युनिझमचे स्वप्न पाहिले होते. म्हणून, राष्ट्रवादी विस्ताराचे रूप धारण करूनच चीन स्वतःचे स्थान दक्षिण आशियात निर्माण करण्यासाठी प्रवृत्त झालेला दिसतो आहे. पण यामुळे चीनमध्येदेखील प्रादेशिकवादाला चालना मिळू शकते. मंगोलियन वंशवाद चीनमध्ये मूळ धरू लागल्यामुळे मंगोलियन प्रादेशिकता चीनमध्ये डोके वर काढू शकते व मंगोलवंश भारताच्या ईशान्येकडल्या राज्यांतूनही वास्तव्य करून असल्यामुळे मंगोल प्रादेशिकवाद चीनच्या राष्ट्रवादाला कधीतरी आव्हान उभे करील, हे लक्षात घ्यायला हवे. म्हणून, रशिया-सारखीच चीनचीही परिस्थिती होऊ शकते, हे गृहीत धरायला हवे. भारताविषयीही याच संदर्भात विचार करायला हवा. कारण, भारताचे झालेले विभाजन व त्यातून अस्तित्वात आलेली भारत व पाकिस्तान ही दोन स्वतंत्र राष्ट्रे अंतर्गत असंतोषाने पोखरली जाऊ शकतात. याची लक्षणे दिसतही आहेत! पाकिस्तानच्या निर्मितीमुळे भारत जसा खंडित झाला, तसाच पाकिस्तानही बांगलादेशाच्या निर्मितीमुळे खंडित झालाच आहे. ही दोन्हीं उदाहरणे अंतर्गत असंतोषाच्या लक्षणांतलीच मानायला हवीत. म्हणून दक्षिण आशियात निर्माण झालेली राजकीय परिस्थिती अमेरिकी साम्राज्यवाद व चिनी विस्तारवाद या दोहोंमधल्या संघर्षाची पार्श्वभूमी निर्माण करण्यास

कारणीभूत ठरते आहे किंवा काय, हे अर्थातच जाणून घ्याला हवे!

**५. क्रांती आणि स्वातंत्र्याची दिशादर्शक व्यूहरचना**

भारत खंडित होऊन भारत-पाकिस्तान ही दोन स्वतंत्र राष्ट्रे अस्तित्वात आल्यापासून या दोन्ही राष्ट्रांत राष्ट्रीय एकात्मतेविषयी बोलायला सुरुवात झाली. कारण या दोन्ही राष्ट्रांत राष्ट्रीय एकात्मतेचा प्रश्न उपस्थित झालाच! राष्ट्रांतर्गत अशांतीला केंद्र करणारा हा प्रश्न असल्याचेच गृहीत धरून त्याविषयीचा समज करून घेतला गेला आहे, पण यावर उपाययोजना करण्याची दूरदृष्टी दाखवली गेले नाही, अजूनही ती दाखवली जात नाही! कारण राष्ट्रीयता आणि एकात्मिकता या दोन्हींचा समन्वय कशा तऱ्हेने साधला जाऊ शकेल, याविषयी पुरेसा विचार केला गेलेला नाही. राष्ट्रीयता लक्ष्य करूनच एकात्मिकता साधण्याचा विचार केला जातो. पण, लोकजीवनात एकात्मिकता आली नसेल व येणारच नसेल, तर राष्ट्रीय एकात्मिकता कशी साधली जाणार? म्हणून, लोकजीवनातच एकात्मिकता सर्वप्रथम यायला हवी. यातूनच राष्ट्रीय एकात्मिकता साधली जाऊ शकेल. म्हणून, 'राष्ट्रीय एकात्मता' असा उच्चार करण्याऐवजी 'एकात्मिक राष्ट्रीयता' असाच करायला हवा! कारण, लोकांच्या एकात्मिकतेतूनच राष्ट्राची एकात्मिकता साधता येऊ शकेल. पण याचा उलटा क्रम लावून राष्ट्र पहिले व एकात्मिकता नंतर असा अर्थ केला जातो. अर्थात, एकात्मिकता पहिले व राष्ट्र नंतरचे असा क्रम लावायला हवा. पण, जेव्हा राष्ट्रवादाच्या अनावश्यक व अनाठायी आस्थेतूनच विचार केला जातो, तेव्हा लोकांची एकात्मिकता दुर्लक्षिली जाते! म्हणून, राष्ट्रवादाच्या आग्रहातून अथवा राष्ट्रवादाला वाजवीपेक्षा जास्त महत्त्व देऊन लोकांमध्ये एकात्मिकता येत नाही, ही एक वस्तुस्थितीच आहे. याचे भान ठेवूनच राष्ट्रवादाचा पुरस्कार करायला हवा व लोकांची एकात्मिकता साधता आल्यासच राष्ट्र व राष्ट्रीयता अस्तित्वात राहू शकते, हेच जाणून घ्यायला हवे! पण, राष्ट्रवादाच्या आग्रहातून लोकांच्या एकात्मिकतेचा विचार केला जात नाही व केला जाणे शक्य होतही नाही. म्हणून, राष्ट्रवादाच्या दुराग्रहातूनच राष्ट्रे खंडित होत असतात, हे लक्षात घेणे गरजेचे होऊन बसते.

क्षेत्रीयता व क्षेत्रवाद या दोन्ही गोष्टी राष्ट्रवादाच्या आग्रहातूनच निपजत असतात, हेदेखील लक्षात घ्यायला हवे. क्षेत्रीयता हा क्षुद्र विचार आहे व तो तसाच असू शकतो. म्हणून यातूनच 'क्षुद्र क्षेत्रवाद' अस्तित्वात येत असतो. भाषिक तत्त्वावर राज्ये अस्तित्वात आणली जावीत, हा विचार राज्यकारभार लोकांच्या भाषेतूनच चालवला जावा या हेतूने अस्तित्वात आला. पण, यातून भाषावादाला चालना मिळाली. म्हणून, 'भाषावार प्रांत-रचना' ही संकल्पना भारतात राबवली गेली. लोकांच्या भाषेतून राज्यकारभार चालावा हा हेतू त्यात होता व आहे. पण, प्रत्येक भाषा स्वतंत्र असल्यामुळे प्रांतांना वा राज्यांना भाषिक स्वायत्तताच पुढे जाऊन क्षेत्रवादाला चालना देऊ शकते, याचे भान मात्र ठेवता आले नाही. म्हणून, यातूनच भाषिक सत्तावाद अस्तित्वात आला. भारतापुरता विचार केल्यास कम्युनिझमच्या विचारसरणीत प्रत्येक भाषा तिच्या स्वायत्त स्वरूपामुळे 'राष्ट्र' या संकल्पनेतली असते व असू शकते. म्हणून, यानुसारच प्रत्येक भाषेचे 'स्वतंत्र राष्ट्र' मानले जाते. यातूनच क्षेत्रवादाला 'क्षुद्र क्षेत्रवादा'चे रूप येऊ शकले आहे. अर्थात, 'क्षुद्र क्षेत्रवाद' राष्ट्रीयतेला घातकच ठरतो. म्हणजे तो राष्ट्रीयतेला खंडित करतो! म्हणून, तो एकात्मिकतेला पोषक नसतो व नाही. एका राष्ट्राच्या अनेक भाषांची एकात्मिक राष्ट्रीयता निर्माण करण्यास याचा उपयोग होत नसतो! राष्ट्रवादाच्या दुराग्रहाचाच हा परिणाम म्हणायला हवा. तेव्हा, भारताच्या परिस्थितीत खंडितपणाची बीजे रुजवली गेली आहेत, हे मान्य करूनच भारतीय स्वातंत्र्याच्या यशापयशाचा विचार करायला हवा. म्हणून रशिया, चीन व भारत या तीनही राष्ट्रांत ज्या तऱ्हेची परिस्थिती या वेळी दिसते आहे, ती क्रांती आणि स्वातंत्र्याच्या दृष्टीने फारशी आशादायी वाटत नाही, हे खरेच आहे. पण, यामुळे क्रांती व स्वातंत्र्याची संकल्पना ज्या शोषणरहित व शासननिरपेक्ष उद्देशातल्या आहेत तो निरर्थक ठरू नये, याचीही काळजी घ्यायलाच हवी! कारण, शोषणरहित शासननिरपेक्षतेची उद्दिष्टे मानवीय उज्ज्वल भविष्य घडवण्याची व प्रेरक सहजीवनाची मानली गेली आहेत. ती साध्य करण्याचा प्रश्न आहे.








म्हणून, याचेच समाधान शोधायला हवे आहे! या दृष्टीने क्रांती आणि स्वातंत्र्याच्या दिशा प्रशस्त करण्यासाठी नव्याने विचार करायला हवा. याला चालना देण्याच्या दृष्टीने काही घडले किंवा घडते आहे काय, हे पहायला हवे. क्रांती व स्वातंत्र्य आवश्यक मानूनच या दोन्हींची व्यूहरचना करण्याच्या दृष्टीने प्रयत्न झाले व होत आहेत. यातल्या उणिवा लक्षात घेऊनच नव्या व्यूहरचनेची वाट धरण्यासाठी व त्याच्या घडणीसाठी 'नवा प्रकाश' ज्या मानवीय दृष्टिकोनातून पुढे येत असलेला दिसतो आहे, त्याकडे डोळसपणे पहायला हवे. या दृष्टीने विनोबा आणि जयप्रकाश या दोघांनी जी मार्गक्रमणा केली होती, त्याचा गाभा पूर्वग्रहातून मुक्त होऊनच धैर्यपूर्वक जाणून घ्यायला हवा!

### ८. विनोबा आणि जयप्रकाश

महात्मा गांधींच्या निधनानंतर क्रांती आणि स्वातंत्र्याची भूमिका स्वीकारून सक्रिय झालेली विनोबा आणि जयप्रकाश ही दोनच विशिष्ट व्यक्तिमत्त्वाची नावे प्राधान्याने घेतली जाऊ शकतात. याचे कारण असे, की शोषणरहित शासननिरपेक्षवृत्तीची जोपासना या दोघांनीच आपल्या परीने या देशात केली. स्वतःचे व्यक्तिगत जीवनही त्याच अनुषंगाने ठेवून स्वतःची चारित्रिक प्रतिमा त्यांनी निर्माण केली. क्रांतीचे व स्वातंत्र्याचे इतर अनेक सक्रिय उपासक या देशात होते व असतीलच. पण, शोषणरहित शासननिरपेक्षतेची निष्ठा बाळगून असणाऱ्यां-पैकीच ते होते वा आहेत, याची खात्री यांच्या बाबतीत देता येत नाही. म्हणूनच विनोबा व जयप्रकाश या दोघांचा वेगळेपणा भारतात व जगातही उठून दिसला होता! या दोघांनी क्रांती आणि स्वातंत्र्याकडे कसे पाहिले होते, हे जाणून घ्यायला हवे. कारण, यातूनच कदाचित क्रांती व स्वातंत्र्याची नवी वाट दृष्टीस पडण्याची शक्यता आहे. अर्थात, ही वाट रशिया व चीनच्या क्रांतीचा पुरस्कार करू शकणारीच असू शकेल, असे म्हणता येत नाही. पण, रशिया व चीनच्या क्रांत्यांना दुर्लक्षून जाणारीही ती असणार नाही, हे स्पष्ट आहे. कारण, रशिया आणि चीन या दोन राष्ट्रांतूनच शोषणरहित शासननिरपेक्ष नव्या रचनेची स्फूर्ती जगाला मिळू शकलेली आहे. पण, यांच्या व्यूहरचनेत विसंगती राहून गेल्यामुळे क्रांतीची मूळ संकल्पना प्रदूषित झाली. यातूनच महात्मा गांधींचा सत्याग्रह हा एक नवा पर्याय जगासमोर येऊ शकला. म्हणून, रशिया व चीनची क्रांती स्वीकारून पुढे जाण्याची तशी गरजही उरलेली नाही! पण, पुढे जाण्याचा मार्ग प्रशस्त करण्यासाठी महात्मा गांधींचा सत्याग्रह निःसंकोचपणे स्वीकारण्याची परिस्थिती राहिलेली या वेळी प्रत्यक्षात दिसत नाही! असे जरी असले, तरी विनोबा व जयप्रकाश या दोघांनी महात्मा गांधींचा सत्याग्रह परिष्कृत करून नव्या दमाने पुढे नेण्याचा जो प्रयत्न केला होता, तो कितपत प्रयोजनकारी मानता येईल, हा प्रश्न काहींच्या वतीने अद्याप निर्माण केला जातोच आहे! पण, विनोबा व जयप्रकाश या दोघांनी जी मार्गक्रमणा केली आहे, ती जगातल्या मानसिकतेत आशा पल्लवित करणारीच म्हणावी लागेल. कारण, या दोघांपेक्षा अन्य कोणीही अशा प्रवृत्तीला चालना देऊ शकलेले आधुनिक काळात तरी दिसून येत नाहीत. म्हणून, सावधगिरी बाळगूनच यावर विचार करायला हवा!

भारताची उत्तरेकडील राष्ट्रीय सीमा मानली जाते ती मॅकमोहन रेषा ओलांडून भारतात १९६२ साली आसामच्या तेजपूरपर्यंत चीनने आपली सेना आणली होती. मॅकमोहन रेषा ब्रिटिशांनी निर्माण केली, ती चीनला मान्य नाही. पण, ही रेषा ओलांडून भारताच्या सीमेत चीनच्या सेनेने प्रवेश केला. यामुळे चीनने भारतावर आक्रमणच केले, असे भारतात मानले गेले होते. या वेळी विनोबा पश्चिम बंगालमधून पदयात्रा करीतच बिहारमध्ये प्रवेश करणार होते. भारतात झालेल्या चीनच्या अतिक्रमणानंतर अनेकांनी अनेक परींनी भाष्य केले होते. विनोबांनीही भाष्य केलेच होते. ते म्हणाले होते त्याचा आशय असा होता : 'भारतावर चीनचे वैचारिक आक्रमण झाले आहे. चीनच्या विचारापेक्षाही श्रेष्ठ विचार भारताजवळ असायला हवा. तो श्रेष्ठ विचार 'ग्रामदानात' आहे. म्हणून, 'ग्रामदान' सुरक्षेचे कवच आहे (डिफेन्स मेझर), या विचाराची परिपूर्ती भारतात झाली तर हेच चीनला दिलेले प्रभावी उत्तर ठरेल.'

विनोबांनी केलेले हे चिनी आक्रमणावरचे भाष्य त्या वेळी दुर्लक्षित राहिले होते व या वेळीही ते दुर्लक्षितच ठेवले गेले आहे. पण, यामुळे भारताच्या स्वातंत्र्याची

वैचारिक दिशा अवरुद्ध झालेली दिसतेच आहे! विनोबांनी 'भूदान' हा शब्दप्रयोग करून व भूदान प्रत्यक्षात मिळवून मूलभूत परिवर्तनाच्या क्रांतिकारी जाणिवेत मोलाची भर घातली आहे. कारण, 'दान' हा शब्दप्रयोग त्यांनी 'स्वामित्वविसर्जन' या अर्थानेच स्वीकारला होता. हा शब्द मुळात आद्यशंकराचार्यांचा आहे. 'दानं संविभाग:' या संस्कृत वचनात तो आद्यशंकराचार्यांनी प्रतिष्ठित केला आहे. समान विभाजन हे जर कम्युनिझमला मान्य आहे, तर 'दान' कम्युनिझमच्या विरोधातले नाही हे विनोबांनी जाणले होते व ते या देशातल्या कम्युनिष्टांना पटायला हवे होते. पण, एकीकडे कम्युनिझम स्वामित्वविसर्जन मान्य करतो; पण, दुसरीकडं प्रत्यक्षात कम्युनिष्ट राज्य-शासनाचे स्वामित्वही कम्युनिस्ट स्वीकारतात, ही विसंगतीच आहे! यावर भारतीय कम्युनिष्टांनी पुरेसा विचार केलेला नाही. भारतीय तत्त्वज्ञानाच्या संदर्भात विचार करायचा तर 'विश्वं पुष्टं ग्रामे अस्मिन् अनातुरम्' या संस्कृत वचनात ग्रामदानाचा विचार सामावलेला दिसेल. महात्मा गांधींचा ग्रामस्वराज्य हा विचार यात सामावलेला आहे. म्हणून विनोबांनी 'ग्रामदान' शब्द योजून नुसती त्यांची प्रतिभा त्यांनी प्रदर्शित केलेली नाही; भारतीय जीवनदर्शनही 'ग्रामदान' शब्दातून त्यांनी व्यक्त केले आहे! भूदानात स्वामित्वविसर्जन आहे. पण, ग्रामदानात स्वामित्व-विसर्जनाबरोबरच ग्रामभावनेला प्रतिष्ठित करण्याची कुशलताही आहे. व्यक्तीची स्वामित्वभावना विसर्जित केली जावी व ग्रामभावनेतले व्यवस्थादर्शक ग्रामस्वामित्व स्वीकारले जावे, हा जो निर्देश ग्रामदानातून विनोबांनी दिला, तो भारताच्या राजकीय स्वातंत्र्यानंतरच्या भारत-नवनिर्माणाची दिशा व्यक्त करणारा आहे. म्हणून, चीनच्या आक्रमणाचा अर्थ चीनला जी समाजरचना अभिप्रेत आहे ती भारताने स्वीकारावी या आग्रहातला आहे व हा आग्रह सैनिकी आक्रमणातूनच चीनने व्यक्त केलाही आहे. हे लक्षात घेऊनच जर भारताने राष्ट्रीय नियोजन (नॅशनल प्लॅनिंग) अस्तित्वात आणले असते, तर चीनचे जे भय वाटत असते त्यातून मुक्त होता आले असते. यामुळे चीनच्या अंतर्गत रचनेतही फरक पडला असता. म्हणून, भारताचा विचार चीनने स्वीकारलाही असता! या संदर्भात विनोबांच्या कार्याकडे पाहण्याची गरज होती. आजही ती गरज आहेच. पण याची पूर्तता होऊ शकली नाही. म्हणूनच चीनचा विचार भारतात पसरण्याच्या दृष्टीने नक्सली-माओवादाचा उदय भारतात झालाही आहे! अर्थात, तो भारताला भेडसावणाराच म्हणता येईल. अशा एका पद्धतीने महात्मा गांधींचा 'सत्याग्रह'-विचार विनोबांनी त्यांच्या तप:साधनेतून या देशात पुढे नेण्याचा उपक्रम आरंभिलेला होता व तो अतिशय महत्त्वाचाच मानला गेला आहे.

जयप्रकाश नारायण मुळातले समाजवादी होते. महात्मा गांधींनी त्यांच्याविषयी म्हटले होते, की 'समाजवाद जयप्रकाशकडून समजून घ्यायला हवा. जयप्रकाशला समाजवाद समजला नसेल, तर या देशात तो कोणालाच समजला नाही व समजणारही नाही, असेच म्हणावे लागेल.' तेव्हा, समाजवादी जयप्रकाश महात्मा गांधींच्या सत्याग्रहाच्या आकर्षणातूनच विनोबांच्या भूदान कार्याकडे वळले होते. त्यांनी या बाबतीतले विस्तृत विवेचन 'फ्रॉम सोशलिझम् टू सर्वोदय' (समाजवाद से सर्वोदय की ओर) या ग्रंथात केलेले आहे. पण, जयप्रकाशांचे सर्वोदयाकडे वळणे समाजवाद्यांनी मान्य केले नव्हते व सध्याच्या 'उरल्यासुरल्या' समाजवाद्यांनाही ते अद्याप मान्य होत नाहीच आहे. याचे मुख्य कारण असे, की राज्यशासन चालवणारा समाजवादी पक्ष अस्तित्वात असावयाला हवा, हेच जयप्रकाशांनी अमान्य केले असल्याचे समाजवाद्यांना वाटले होते. म्हणून राज्यशासन चालवण्यापासून स्वत:ला वेगळे करून घेऊनच समाजवादी शासन असावयाला हवे, हेही जयप्रकाशांनी अमान्य केले असल्याचे या देशातल्या समाजवाद्यांना वाटले होते व अजूनही 'उरल्यासुरल्या' समाजवाद्यांना वाटतेच आहे! म्हणून, शासनव्यवस्थेत समाजवाद्यांचे स्थान निर्माण व्हावे या आकांक्षेत राज्य करण्याची आकांक्षा दडून आहे व ती समाजवाद्यांनी सत्ताधारी व्हावयाला हवे या आकर्षणातली म्हटली जाईल! याची पूर्वकल्पना जयप्रकाशांना आली होती. म्हणूनच क्रांतिमूलक परिवर्तन सत्ताकांक्षेतून होत नाही व ते केलेही जात नाही, कारण सत्ताकांक्षाच क्रांतीला मारक ठरते, हे रशियाच्या अनुभवातून प्रत्ययाला आले असल्यामुळे याची जाणीव जयप्रकाशांनी सदोदित बाळगली

होती. म्हणूनच ते स्वतः सत्ताविहीन स्थितीत राहू शकले होते व क्रांतीची भूमिका मान्य करणाऱ्यांनीही सत्ताविहीन अवस्थेतच वावरायला हवे, असा सल्लाही ते देत राहिले होते. अर्थात, हे समाजवाद्यांना मानवणारे नव्हते, मानवले नाही. पण, सत्ताविहीन अवस्थेत सत्याग्रहाचे तत्त्वज्ञान जगण्यास संधी उपलब्ध होत असते, हेच लक्षात घेऊन सत्तेचे राजकारण जयप्रकाशांनी अमान्य केले होते. म्हणून, क्रांतीच्या दिशेने जाण्यासाठी सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा त्यांनी नुसता स्वीकारच केला नव्हता, तर सत्याग्रहाची विकासप्रक्रिया चालवण्यासाठी पुढाकारही घेतला होता. विनोबांचा सत्याग्रह भूदान-ग्रामदानात व्यक्त झाला. पण, तो निर्णायक दिशेने पुढे जावा हे जयप्रकाशांना वाटत होते. म्हणूनच ते महात्मा गांधींच्या सत्याग्रह-संघर्षाकडे वळलेही होते. पण, विनोबा सत्याग्रह-संघर्षाकडे वळलेच नाहीत. कारण, त्यांना याची गरज वाटली नव्हती. मात्र, सत्याग्रह-संघर्षाची गरज जयप्रकाशांना वाटली. यातच या दोघांचे वेगळेपण स्पष्ट होऊ शकले. या वेगळेपणात परस्परभिन्नताच फक्त होती, विरोध नव्हता. कारण, विनोबा जिथवर जाऊन पोचले, त्यापुढे जाणेच अगत्याचे वाटून जयप्रकाश पुढे गेले. विनोबांनी थांबून राहून स्वतःची इतिकर्तव्यता संपवली. यातूनच त्यांनी निर्वाणही साधले! म्हणून, जयप्रकाश यांचा सत्याग्रह-संघर्षाकडे पाहण्याचा दृष्टिकोण स्पष्ट करून घ्यायला हवा.

## ९. जयप्रकाशांची संपूर्ण क्रांती

बिहारमध्ये १९७१ पासून जी परिस्थिती निर्माण होत गेली, त्यातून बिहारमध्ये विद्यार्थ्यांची भ्रष्टाचारविरोधाची चळवळ अस्तित्वात आली. ती जनसंघर्षात जाऊन पोचली. १९७७ साली या चळवळीला अंतिम स्थिती प्राप्त झाली. यातून केवळ सत्तापरिवर्तनच पुरेसे नाही, तर 'संपूर्ण क्रांती'च व्हावयाला हवी ही आकांक्षा उदयाला आली. जगात झालेल्या सर्वच क्रांत्यांची अपूर्णता लक्षात घेऊनच जयप्रकाशांनी 'संपूर्ण क्रांती'ची घोषणा केली. १९७७च्या केंद्रातल्या व बहुतेक सर्वच राज्यांत घडून आलेल्या सत्तापरिवर्तनानंतर 'संपूर्ण क्रांती' पुढे जावी कशी, या बाबतीत पुरेसे विचारमंथन होऊ शकले नव्हते. कारण, जेपींचे निधन झाल्यामुळे यासाठी मिळायला हवा होता तेवढा अवधी त्यांना मिळूच शकला नव्हता. म्हणून, 'संपूण क्रांती'च्या दिशेने पुढची वाटचाल अद्याप होऊ शकली नाही. पण, क्रांती आणि स्वातंत्र्याच्या भूमिकेत जो एक तऱ्हेचा गंजलेपणा आला होता, तो घासूनपुसून स्वच्छ करायला हवा होता. हेच जयप्रकाशांनी केले होते. अर्थात, स्वातंत्र्याच्या संकल्पनेला जयप्रकाशांनी आणि केवळ जयप्रकाशांनीच नवा तजेला दिला व तो या वेळी जागतिक परिस्थिती लक्षात घेता पुढच्या वाटचालीसाठी मार्गदर्शकच ठरलेला आहे, हे कोणालाच अमान्य करता येत नाही! अर्थात, सर्वोदयाचे जे सूत्र विनोबांच्या प्रतिभेतून पुढे आले ते 'हिंसाविरोधी राज्य-शक्तीहून भिन्न स्वतंत्र लोकशक्ती' या नावानेच ओळखले जाते. या सूत्रात 'स्वतंत्र लोकशक्ती' निर्माणाच्या दृष्टीने पुढची वाटचाल व्हावयाला हवी होती. ही वाटचाल १९७४ साली जयप्रकाशांनीच बिहारची भ्रष्टाचारविरोधी चळवळ उभारून केलीही होती. ती पुढे जावी तशी अद्याप गेलेली नाही, हे खरेच आहे. पण, जगातल्या परिस्थितीत सर्व तऱ्हेच्या राज्यशक्ती हतबल झालेल्या दिसत आहेत. म्हणून त्या जागतिक सहजीवनाला सर्वस्वी निरुपयोगीच ठरल्याचे लक्षातही येत आहे! म्हणूनच जागतिक पातळीवर अनेक राष्ट्रांत लोकांच्या बंडाळयाही होऊ लागलेल्या आहेत. यातून मोठ्या प्रमाणात हिंसाचार घडून येत आहे. हे सर्व कुठे जाऊन थांबेल, या बाबतीत कोणताही अंदाज बांधता येत नाही. पण, कदाचित या स्थितीत तिसऱ्या जागतिक महायुद्धाकडे वाटचाल होऊ शकते, एवढे मात्र लक्षात घ्यायलाच हवे. अर्थात, यातूनच यशस्वी जागतिक सहजीवन घडून येईल किंवा काय, हा एक कळीचा प्रश्न उपस्थित झाला आहे!

**उपसंहार :**

तात्पर्य असे, की भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीत महात्मा गांधींनी ज्या सत्याग्रहाचे अनुसरण केले होते, त्यातूनच जगाला सहजीवनासाठी प्रेरणा व नवा प्रकाश मिळू शकेल, असे वाटते. कारण, भांडवलशाहीचा साम्राज्यवाद व कम्युनिझमचा विस्तारवाद या दोन्ही संकल्पना या वेळी कालबाह्य झालेल्या दिसतात. यामुळे क्रांतीतली शोषणरहित शासननिपेक्षतची संकल्पना रशिया आणि चीनच्या क्रांत्यांतून उजळून निघण्याच्या ऐवजी

पुसून जाण्याच्या स्थितीला येऊनच पोचलेली दिसते आहे. तिचे संवर्धन सत्याग्रही तत्त्वज्ञानानेच होऊ शकेल असेच जर मानले, तर जयप्रकाशांनी ज्या 'संपूर्ण क्रांती'ची घोषणा केली होती, ती सत्याग्रह-संघर्षाच्या पुरस्कारातूनच साकारली जाऊ शकेल, याची आशा वाटते व याची शक्यताही आहे, असेच वाटते. अन्यथा जागतिक पातळीवर राज्यकर्त्यांच्या विरोधात व निषेधार्थ लोकभावनांचा जो उद्रेक होताना दिसून येत आहे, तो शमणार नाही. यामुळे जगाची एकूण परिस्थिती विनाशाकडेच द्रुतगतीने जात राहील !

★★★

---

# भारतातील कल्याणकारी राज्याचा बदलता दृष्टिकोन

भगवान माने

**प्रस्तावना**

कल्याणकारी राज्याची संकल्पना वैश्विक स्वरूपाची आहे. पहिल्या आणि दुसऱ्या महायुद्धामुळे वैश्विक स्तरावर गरिबी, दारिद्र्य, उपासमार, अन्नधान्यटंचाई इत्यादींच्या झालेल्या दुष्परिणामावर उपाययोजना करण्यासाठी भांडवशाही आणि साम्यवादी अर्थव्यवस्थेने कल्याणकारी राज्याचा मार्ग स्वीकारला. कल्याणकारी अर्थशास्त्राचा पेरिटो यांचा सामाजिक अनुकूलता अवस्थेचा सिद्धान्त कल्याणकारी अर्थशास्त्राचा पहिला टप्पा आणि कॅलडॉर व हिक्स यांचा 'नुकसानभरपाईचा सिद्धान्त' हा दुसरा टप्पा मानला जातो. बर्गसन, सॅम्युअलसन लिटल आणि तेरी या अर्थतज्ज्ञांनी मांडलेला विचार समाजकल्याणक्रिया नावाने ओळखला जातो. स्वातंत्र्यानंतर भारतीय संविधानात उद्देशपत्रिका आणि राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांद्वारे कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करण्याचे उद्दिष्ट पुढे ठेवले आहे. जगातील अनेक देशांनी व्यवस्था-परिवर्तनाच्या दृष्टिकोनातून कल्याणकारी राज्याचे उद्दिष्ट स्वीकारले; परंतु संविधानात कल्याणकारी राज्यव्यस्थेचे उद्दिष्ट असणारा भारत हा जगातील पहिला देश आहे. युरोपमधील राजकीय व्यवस्थांनी साम्यवादी व्यवस्थांना पर्याय आणि वर्गसंघर्ष कमी करण्याच्या उद्देशाने कल्याणकारी राज्याचा पर्याय स्वीकारला. परंतु भारताने समाजवादी आणि भांडवलशाहीच्या गुणदोषांचा तुलनात्मक अभ्यास करून त्यांमधील दोष टान मिश्र अर्थव्यवस्थेद्वारे कल्याणकारी राज्याचे उद्दिष्ट गाठण्याचे ध्येय पुढे ठेवले, परंतु नव्वदीच्या दशकानंतर उत्तर- आधुनिक वादामुळे भारतातील कल्याणकारी राज्याचा दृष्टिकोनही बदलला आहे.

**कल्याणकारी राज्याची संकल्पना**

कल्याणकारी राज्याच्या संकल्पनेचे मूळ उगमस्थान ज्युडाओ ख्रिश्चन टीचिंगमध्ये दिसून येते. सामाजिक सेवांची पूर्तता करणे हे राज्याचे मुख्य कर्तव्य आहे. परंतु भांडवलशाही अर्थव्यवस्थेने उत्पादन आणि नफ्याकडे अधिक लक्ष देऊन व्यक्तिविकासाकडे दुर्लक्ष केले. तसेच साम्यवादी अर्थव्यवस्थेने व्यक्ती आणि समाजाचे हितसंवर्धन जोपासताना व्यक्तिस्वातंत्र्य व लोकशाही मूल्यांना पायदळी तुडविले. म्हणून भांडवलशाही आणि साम्यवादी अर्थव्यवस्थेतील दोष टाळण्यासाठी कल्याणकारी राज्याची संकल्पना अस्तित्वात आली.

**कल्याणकारी राज्याची व्याख्या**

संयुक्त राष्ट्रसंघाने कल्याणकारी राज्याची अशी व्याख्या केली आहे, की "प्रत्येक व्यक्तीला किमान जीवनमान आणि जगण्याचा अधिकार आहे. त्यानुसार प्रत्येक कुटुंबातील व्यक्ती आणि समाजाचे स्वास्थ्य सुरक्षित असेल; अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्याच्या सोयी-सुविधा प्राप्त होतील; तसेच समान सामाजिक सुरक्षिततेच्या अधिकाराच्या सर्व स्तरांवर उपयुक्ततेच्या अधिकाराचा स्वीकार करणे होय."[१] एनसायक्लोपिडीया ब्रिटानिकानुसार, "कल्याणकारी राज्य ही अशी कायदेशीर शासनप्रणाली आहे, की जिच्याद्वारे बेरोजगारी, अपघात, रोगराई, वृद्धापकाळातील सेवा, सामाजिक विमा इत्यादींद्वारे प्रामुख्याने समाजातील नागरिकांच्या आर्थिक आणि सामाजिक कल्याणाचे रक्षण आणि संवर्धनाचे कार्य होईल."[२]

राज्यशास्त्रकोशानुसार, "समाजातील गरजू व दुर्बल घटकांचे सामाजिक व आर्थिक प्रश्न सोडविण्याचे खास प्रयत्न कल्याणकारी राज्य करते."[३]

समाजविज्ञानकोशानुसार, "आपल्या समाजातील सदस्यांच्या मूलभूत कल्याणाचे उत्तरदायित्व स्वीकारण्याचे कार्य कल्याणकारी राज्य करते."[४]

मराठी विश्वकोशानुसार, "स्थूल मानाने देशातील सर्व नागरिकांच्या मूलभूत कल्याणाची म्हणजे योगक्षेमाची जबाबदारी स्वीकारून त्यानुसार आपली शासकीय धोरणे

व कार्य ठरविणारी राज्यसंस्था म्हणजे कल्याणकारी राज्य होय."[५]

जी. डी. कोल यांच्या मतानुसार, "कल्याणकारी राज्य म्हणजे एक असा समाज आहे, की ज्यामध्ये एका निश्चित जीवनमानाची हमी आणि नागरिकांना सर्व सुखसोयी उपलब्ध करून दिल्या जातात."

यावरून असे स्पष्ट होते, की कोणत्याही राजकीय व्यवस्थेत व्यक्तीचा विकास आणि कल्याणाला प्राधान्य देणे हा कल्याणकारी राज्याचा मुख्य उद्देश असतो.

**कल्याणकारी राज्याची ऐतिहासिक पार्श्वभूमी :**

कल्याणकारी राज्याच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीला तीनशे वर्षांची परंपरा असून कल्याणकारी राज्याचे उगमस्थान ब्रिटनच्या राजकीय व्यवस्थेत आहे. मध्य युगात ब्रिटनमध्ये धर्मादाय संस्था व धर्मगुरूंद्वारे समाजातील गरीब लोकांना शाळा, दवाखाने यांसाठी मदत केली जात असे. पहिल्या एलिझाबेथच्या काळात १६०१ मध्ये 'गरिबांसाठी कायद्या' (पुअर ॲक्ट) अंमलबजावणी केली होती. १८९२ मध्ये ग्लॅडस्टोनने ब्रिटनच्या जनतेसाठी कल्याणकारी योजना अमलात आणल्या होत्या. फ्रान्समध्ये तिसऱ्या नेपोलियनने कामगारांना वेतनवाढ, निवासस्थान, आजारी आणि वृद्ध लोकांसाठी कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी केली होती. तसेच बिस्मार्कने राजेशाहीच्या सवंग लोकप्रियतेसाठी सामाजिक सुरक्षा, आपत्कालीन मदत, वैद्यकीय सुविधांची अंमलबजावणी केली. वास्तविक पहिल्या महायुद्धानंतर जागतिक स्तरावर निर्माण झालेल्या विविध संकटांशी सामना करण्यासाठी कल्याणकारी राज्याला चालना मिळाली."[६]

कल्याणकारी राज्यव्यवस्थेचे समर्थन अनेक विचारवंतांनी केले आहे. राज्यसंस्थेने व्यक्तीच्या विकासासाठी विशिष्ट परिस्थिती निर्माण करावी, अशी भूमिका हॉब्ज आणि लॉकने 'सामाजिक करार' सिद्धान्तातून मांडली; तसेच रास्कोपाऊंड, बेंथॅम, हेरॉल्ड लास्की, जॉन स्टुअर्ट मिलने कल्याणकारी राज्याचे समर्थन केले आहे. कल्याणकारी राज्याला चालना देणारी महत्त्वाची घटना म्हणजे इंग्लंडमधील १७५० ची औद्योगिक क्रांती होय. औद्योगिक क्रांतीमुळे वस्तूंच्या उत्पादनात मोठ्या प्रमाणात वाढ झाली. परंतु कामगार बेकार झाले, कामगारांवर उपासमारीची वेळ आली. कामगारवर्गाचे शोषण होऊ लागले, समाजात आर्थिक विषमता वाढीस लागली. १८ व्या आणि १९ व्या शतकात भांडवलदार आणि सरंजामदारवर्गाकडे संपत्तीचे केंद्रीकरण झाले होते. साम्राज्यवादी प्रवृत्ती वाढली होती. म्हणून भांडवलशाही अर्थव्यवस्थेऐवजी समाजवादी अर्थव्यवस्थेद्वारे राज्याने आर्थिक उत्पादन आणि वितरणव्यवस्था आपल्या हाती घेऊन कल्याणकारी कायद्याची अंमलबजावणी करावी, या मागणीने जोर धरला होता. भांडवलशाही अर्थव्यवस्थेवरील लोकांचा विश्वास कमी होऊ लागला होता. तो विश्वास पुन्हा संपादन करण्यासाठी भांडवलशाही अर्थव्यवस्थेला कल्याणकारी राज्य स्थापन करण्याची गरज निर्माण झाली.

रशियाने साम्यवादी अर्थव्यवस्थेमधून जागतिक महामंदीवर मात केली होती, म्हणून पाश्चिमात्य राष्ट्रांनासुद्धा भांडवलशाही अर्थव्यवस्थेत राज्याच्या हस्तक्षेपाच्या भूमिकेची आवश्यकता वाटू लागली. अधिक उत्पादन, रोजगारनिर्मिती, बेकारी, गरिबीनिर्मूलन आणि जागतिक महामंदीतून बाहेर पडण्यासाठी अर्थतज्ज्ञ जॉन केन्सने 'राज्याच्या हस्तक्षेपाची भूमिका' मांडली होती. अमेरिकेच्या 'न्यू डील पॉलिसी'मुळे महामंदीवरील उपाययोजनेसाठी फायदा झाला. जागतिक महामंदीचा फॅसिस्ट आणि हुकूमशाही राजकीय व्यवस्थेवरही दुष्परिणाम झालेला होता. त्यांनासुद्धा राज्याच्या हस्तक्षेपाची गरज भासू लागली होती. परंतु ॲडम स्मिथने 'मुक्त अर्थव्यवस्थे'त समाजाचे हित आहे, असे प्रतिपादन केल्यामुळे राज्याच्या हस्तक्षेपाची भूमिका मागे पडली. त्याचा परिणाम म्हणजे भांडवली अर्थव्यवस्थेनेसुद्धा कल्याणकारी राज्याचा स्वीकार केला. त्यामुळे साम्यवादी विचाराला कलाटणी मिळाली. यावरून असे स्पष्ट होते, की मानवी कल्याणासाठी, 'कल्याणकारी राज्याची संकल्पना' सर्वच राजकीय व्यवस्थांना सामावून घेते. यामध्ये दुमत असण्याचे कारण नाही.

**भारतातील कल्याणकारी राज्याची ऐतिहासिक पार्श्वभूमी**

भारताला प्राचीन काळापासून कल्याणकारी राज्याचा वारसा लाभला आहे. बुद्धकाळात जनपदाकडून लहान






बालकांचे शिक्षण, सेवाभावी संस्थांकडून लोककल्याणासाठी मदत, सार्वजनिक विहिरी, पिण्याच्या पाण्याचे तलाव, वृक्षारोपण, व्यापारी वाहतुकीचे मार्ग, प्रजेच्या दु:खनिवारणासाठी विविध कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी केल्याचे पुरावे सापडतात.[७] महाभारतात शांतिपर्वाच्या अध्याय ५६, ६३ आणि अध्याय ६४ च्या अनुषंगाने यु. एम. घोषल असे मत व्यक्त करतात, की "राज्याने सामूहिक संरक्षणाची आणि कल्याणकारी राज्यकारभाराद्वारे लोकजीवनात भौतिक आणि नैतिक समृद्धी तसेच समाजात सामंजस्य आणि परस्परसहिष्णुता निर्माण करावी, अशी अपेक्षा होती."[८] कौटिल्याने 'अर्थशास्त्र' ग्रंथात अनाथ, वृद्ध, अपंग, गर्भवती स्त्रिया आणि राज्यातील सर्व प्रजेचे पालनपोषण करावे, असे म्हटले आहे. सम्राट अशोकाने धम्मप्रसार आणि लोककल्याणासाठी 'धम्म महामत्त' अधिकाऱ्याची नियुक्ती केली होती.[९] सम्राट अकबराने राज्यातील प्रजेसाठी अन्न, वस्त्र, निवारा, वैद्यकीय सुविधा, धान्यवितरण व्यवस्था, सुंदर बागबगिचे, करमणुकीच्या सोयी केल्या होत्या. मध्ययुगात छत्रपती शिवाजीमहाराजांनी आज्ञापत्राद्वारे अन्नधान्य उत्पादनवाढ, शेतसारामाफी, वृक्षसंवर्धनासाठी उपाययोजना, तळी आणि तलावांची निर्मिती इत्यादी कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी केल्याचे पुरावे सापडतात. महात्मा बसवेश्वराच्या 'अनुभव मंडप सिद्धान्ता'त अठरापगड जातीच्या लोकांना आणि स्त्रियांना स्थान दिले आहे. त्यांची 'दासोह' संकल्पना कल्याणकारी राज्याची आहे.[१०]

छत्रपती राजर्षी शाहूमहाराजांची ओळख कल्याणकारी राजा अशी आहे. कोल्हापूर संस्थानातील दुष्काळी परिस्थितीवर मात करण्यासाठी धरणे आणि तलावांची निर्मिती, दुष्काळातील लोकांसाठी रोजगार- निर्मिती, अन्नधान्याचे स्वस्त किंमतीत वितरण, पिण्याचे पाणी, रस्ते, पुलांची निर्मिती, लहान बालकांसाठी आरोग्याच्या योजना, गरिबांसाठी आश्रम, दीनदुबळ्या लोकांसाठी शिधावाटप, विविध जाती-धर्मांच्या मुलांसाठी वसतिगृह, मोफत आणि सक्तीचे शिक्षण इत्यादी कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी केली होती. छत्रपती राजर्षी शाहूमहाराज आपल्या २ एप्रिल १८९४ रोजीच्या कल्याणकारी राज्याच्या जाहीरनाम्यात असे म्हणतात, की "आमची सर्व प्रजा सतत तृप्त राहून सुखी असावी, तिच्या कल्याणाची सतत वृद्धी व्हावी व आमचे संस्थानाची हर एक प्रकारे सदोदित भरभराट होत जावी, अशी आमची उत्कट इच्छा आहे."[११]

**भारतीय राजकीय विचारवंतांची कल्याणकारी राज्याची भूमिका**

भारतीय राजकीय विचारवंत आणि समाजसुधारकांनी कल्याणकारी राज्याची भूमिका मांडली आहे. कल्याणकारी राज्यासंबंधी गोपाळ गणेश आगरकर असे म्हणतात, की "सामाजिक सुधारणांची योग्य ती अंमलबजावणी करण्यासाठी कायद्याने त्या बंधनकारक ठरविल्या पाहिजेत. लोकांना चांगले वळण लावण्यासाठी कायद्याचा आधार घेतला, तर त्यात आक्षेपार्ह असे काहीच नाही. सामाजिक सुधारणा घडवून आणणे समाजाचे कर्तव्य होय. परंतु समाज आपले कर्तव्य पार पाडीत नसेल, तर सरकारने त्यासाठी पुढाकार घेतला पाहिजे."[१२] न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी व्यक्तिवाद आणि राष्ट्रवादाचा समन्वय साधण्याच्या दृष्टिकोनातून कल्याणकारी राज्याकडे पाहिले. राष्ट्रपिता महात्मा गांधीजींनी सर्वोदयवादातून कल्याणकारी राज्याचे समर्थन केले. महात्मा गांधीजींची कल्याणकारी राज्याची संकल्पना 'बहुजन हिताय, बहुजन सुखाय' या उपयुक्ततावाद आणि मानवतावादी दृष्टिकोनावर आधारित होती. महात्मा गांधीजी कल्याणकारी राज्याकडे भौतिक वादाऐवजी ईश्वरी कृपा म्हणून पाहतात. स्वातंत्र्यानंतर भारतीय संविधानाद्वारे समाजवादी समाजरचनेद्वारे कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करणारे भारताचे शिल्पकार पंडित जवाहरलाल नेहरू कल्याणकारी राज्यासंबंधी असे म्हणतात, की "आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञानाद्वारे भारतात सामाजिक स्तररचना उंचाविण्यासाठी राहणीमानात सुधारणा, संपत्तीचे समान वाटप, सर्वांना विकासाची समान संधी, चांगल्या आणि उच्च प्रतीच्या जीवनमानाची हमी, सुखी जीवन यांच्या प्राप्तीसाठी लोकशाही नियोजनाद्वारे कल्याणकारी राज्य स्थापन करण्याचे आपले उद्दिष्ट आहे. भारताच्या शेकडो वर्षांच्या इतिहासातून आपल्याला कल्याणकारी राज्याचा बोध घेऊन त्याची काही दशकांत अंमलबजावणी करावयाची आहे."[१३]

यावरून असे स्पष्ट होते, की स्वातंत्र्यानंतर भारतात कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करण्याची राज्यकर्त्यांची प्रबळ इच्छा होती. पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरूंच्या कालखंडात "राष्ट्रीय नियोजन समिती, मिश्र अर्थव्यवस्था, राज्याची सार्वजनिक वितरणाची भूमिका, संसदीय लोकशाही मार्गाने वेगवेगळ्या संरचनांचा वापर करून कल्याणकारी राज्याद्वारे, समाजविकासाला एक नवी दिशा दिली." [१४] नेहरू कालखंडानंतर नेहरूप्रारूपानुसार पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधींनी २० कलमी कार्यक्रमाद्वारे, 'गरिबी हटाव', दारिद्र्यनिर्मूलन, बेरोजगारी समस्या-निवारण, प्राथमिक आरोग्यसुविधा, अपंग, वृद्ध, अनुसूचित जाती-जमातीच्या लोकांना सामाजिक आणि आर्थिक न्याय, राष्ट्रीय संपत्तीचे समान वाटप इ. कार्यक्रमांद्वारे कल्याणकारी राज्याचे उत्तरदायित्व पार पाडले होते." [१५]

## संविधानसभेतील कल्याणकारी राज्यासंबंधीची चर्चा किंवा युक्तिवाद

मसुदा संविधानातील कलम ३१ आणि भारतीय संविधानातील राज्याच्या धोरणाच्या मार्गदर्शक तत्त्वांतील कलम ३९ च्या अनुषंगाने झालेल्या चर्चेतून कल्याणकारी राज्याच्या प्रस्थापनेचे उद्दिष्ट स्पष्ट होते. शुक्रवार दिनांक १४ ऑगस्ट १९४७ रोजी केलेल्या अध्यक्षीय भाषणात पंडित जवाहरलाल नेहरू कल्याणकारी राज्याच्या प्रस्थापनेच्या अनुषंगाने असे म्हणतात, की "गरिबी आणि दारिद्र्याचा अंत करणे, व्यक्ती आणि समाजातील विषमता, भूक, पिळवणूक, आजार आणि असमानता नष्ट करून सर्वांना समान न्याय व संधी देणे हे सरकारचे मुख्य ध्येय असले पाहिजे." [१६] संविधानसभेत पंडित जवाहरलाल नेहरू यांनी ध्येयं आणि उद्दिष्टांच्या पूर्ण-चर्चेवेळी मांडलेल्या उद्दिष्टांच्या आठव्या ठरावातून कल्याणकारी राज्याची भूमिका पुढीलप्रमाणे स्पष्ट होते- "भारत ही प्राचीन भूमी असून विश्वात आपले योग्य आणि सन्माननीय स्थान प्राप्त करील, तसेच विश्वात शांतीच्या प्रस्थापनेसाठी, अखिल मानवजातीच्या कल्याणासाठी आपले अर्थपूर्ण योगदान देईल. आपला दर्जा सन्मानपूर्वक प्राप्त करील आणि मानवी कल्याणासाठी, विश्वशांतीसाठी संपूर्ण सहकार्य करील." [१७] देशात सामाजिक आणि आर्थिक क्रांतीद्वारे कल्याणकारी राज्याच्या प्रस्थापनेसाठी डॉ. राधाकृष्णन यांनी असे म्हटले, की "सामाजिक आणि आर्थिक क्रांतीसाठी बनविलेला आकृतिबंध हा सामान्य लोकांच्या आर्थिक गरजांची पूर्तता करणारा असला पाहिजे, की ज्याद्वारे भारतीय समाजाच्या मूलभूत संरचनेवर खोलवर परिणाम घडू शकेल. कल्याणकारी राज्याचे स्वप्न साकार करण्यासाठी देशातील मूलभूत संरचनेत बदल केल्याशिवाय सर्वांना समान न्याय मिळू शकणार नाही. त्यासाठी मूलभूत संरचनेत बदल करण्याची आवश्यकता आहे."[१८] तसेच राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांतून कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करण्यासाठी कलम ३१ च्या अनुषंगाने नझिरुद्दीन अहमद यांनी पुढीलप्रमाणे सूचना मांडली, "संपत्ती आणि साधनांच्या आर्थिक व्यवस्थेत बदल होणे आवश्यक असून संपत्ती आणि साधनांचा सार्वजनिक हितासाठी वापर करण्याची वृत्ती वाढविणे आवश्यक आहे. संपत्तीचे समान वाटप झाले पाहिजे. त्यासाठी देशातील मूलभूत संरचनेत बदल करण्याची आवश्यकता आहे." [१९]

लक्ष्मीनारायण साहू (ओरिसा-जनरल) यांनी उपकलम ५ च्या अनुषंगाने म्हटले, "कामगारांचे आरोग्य, ताकद आणि वय यांचा दुरुपयोग करून घेण्यात येऊ नये आणि नागरिकांना आर्थिक गरजेपोटी त्यांचे वय किंवा ताकद यास न पेलणाऱ्या व्यवसायात शिरणे भाग पाडू नये." तसेच यामध्ये वय शब्दाबरोबर लिंग (sex), स्त्री-पुरुष या शब्दांचा समावेश करण्याची सूचना केली होती. [२०] भारताने कल्याणकारी राज्याचा पल्ला गाठण्यासाठी पंडित जवाहरलाल नेहरूंनी पुढीलप्रमाणे इशारा दिलेला आहे, "मोठ्या सामाजिक बदलांचे उद्दिष्ट गाठावयाचे असेल, तर भारताला प्रदीर्घ काळ टिकून रहावे लागेल, अन्यथा संविधानसभेतील महत्त्वपूर्ण दस्तऐवज उद्दिष्टहीन आणि उपयुक्ताहीन होतील. जर भारत रसातळाला गेला, तर आपणही रसातळाला जाऊ; जर भारताची भरभराट झाली तर आपणा सर्वांची भरभराट होईल आणि भारत जिवंत राहिला, तर आपण जिवंत राहू." [२१] यावरून असे स्पष्ट होते की, भारताला समाजकल्याणाच्या उद्दिष्टासाठी आपण सारे एक आहोत, ही भावना सर्व पातळीवर जोपासणे गरजेचे आहे. संविधानसभेतील कल्याणकारी राज्याच्या प्रस्थापनेसंबंधी

झालेल्या चर्चा किंवा युक्तिवादासंबंधी ग्रॅनव्हिल ऑस्टीनने असे मत व्यक्त केले, की "संविधानसभेतील चर्चा ही सामाजिक क्रांतीच्या दृष्टीने राष्ट्रीय प्रबोधनाचे कार्य करीत होती. चर्चेतून सामाजिक क्रांतीच्या दिशेने राष्ट्रीय प्रबोधनाचे कार्य आणि कल्याणकारी राज्याचे स्वप्न पाहिले जात होते. परंतु कल्याणकारी राज्याच्या पूर्ततेसाठी संविधानाच्या उद्देश पत्रिकेत आणि राज्याच्या धोरणाच्या मार्गदर्शक तत्त्वांत फक्त निर्देश दिले आहेत"[२२] यावरून असे स्पष्ट होते की, भारतात कल्याणकारी राज्याच्या स्वप्नपूर्ततेची जबाबदारी राज्यकर्त्यांवर सोपविली आहे. मात्र त्यासाठी कोणताही ठोस कायदा केलेला नाही.

**भारतातील कल्याणकारी राज्याची अंमलबजावणी**

भारतातील कल्याणकारी राज्याचा पाया राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांवर आधारित आहे. कलम ३८ (१) नुसार देशात सामाजिक-आर्थिक न्याय प्रस्थापित करण्याचा निर्देश दिलेला आहे आणि ३८ (२) नुसार 'राज्य' हे विशेषतः केवळ व्यक्ति-व्यक्तींमध्ये नव्हे तर निरनिराळ्या क्षेत्रांत राहणाऱ्या किंवा निरनिराळ्या व्यवसायांत गुंतलेल्या लोकसमूहांमध्येदेखील उत्पन्नाच्या बाबतीत असलेली विषमता किमान पातळीवर आणण्यासाठी झटून प्रयत्न करील, अशी तरतूद असून कलम ३९ नुसार राज्य हे विशेषतः पुढील गोष्टी साध्य करण्याच्या दिशेने आपले धोरण आखील आणि ३९ (क) नुसार उपजीविकेचे पर्याप्त साधन मिळविण्याचा अधिकार स्त्री-पुरुष नागरिकांना सारखाच असावा. समाजाच्या भौतिक साधनसंपत्तीचे वाटप, संपत्तीचे विकेंद्रीकरण, बालक व वृद्ध यांच्या आरोग्याची काळजी आणि संरक्षणाची तरतूद केलेली आहे. यावरून असे स्पष्ट होते, की कलम ३८ आणि कलम ३९ अन्वये राज्याने कल्याणकारी राज्यव्यवस्था निर्माण करण्याची हमी घेतलेली आहे. तसेच कलम ३९ (ख), ३९ (ग), ३९ (घ), ३९ (ड) आणि ३९ २ (च) या कलमांचा उद्देशही कल्याणकारी राज्याच्या प्रस्थापनेचा आहे. [२३]

भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू समाजवादी विचाराने भारावून गेले होते. पहिल्या आणि दुसऱ्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९५१-१९६१) विविध कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी केली होती. भारतीय विकासाच्या नेहरूमॉडेलचा पाया मिश्र अर्थव्यवस्थेवर आधारित होता. उत्पन्न आणि संपत्तीमधील विषमता कमी करून संपत्तीच्या समान वाटपावर अधिक भर दिलेला होता. तिसऱ्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९६२-१९६६) पंतप्रधान लालबहाद्दूर शास्त्री यांनी पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या पावलावर पाऊल ठेवून कल्याणकारी योजनांची अंमलबजावणी केली होती. १९६६ ते १९६९ या कालखंडात तीन वार्षिक योजनांची अंमलबजावणी करण्यात आली होती. चौथ्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९६९-१९७४) पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी मजुरांसाठी किमान वेतनाची हमी दिली होती. पाचव्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९७४-१९७९) २० कलमी कार्यक्रमातून कल्याणकारी राज्याच्या दिशेने वाटचाल केली. सहाव्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९७९-१९८६) पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांची ३१ ऑक्टोबर १९८४ रोजी हत्या झाली. त्यानंतर मोरारजी देसाई पंतप्रधान झाले. परंतु जनता पक्षाला लोकसभेत बहुमत सिद्ध करता आले नाही. त्यामुळे पुन्हा काँग्रेस सत्तेवर आली. सातव्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९८६--१९९०) विश्वनाथ प्रतापसिंग, चंद्रशेखर आणि राजीव गांधी यांनी पंतप्रधानपदाचा कार्यभार वाहिला. परंतु राजकीय अस्थिरतेचा काळ म्हणून या कालखंडातील पंचवार्षिक योजनांकडे पाहिले जाते. विश्वनाथ प्रताप सिंग यांनी मंडल आयोगाची अंमलबजावणी करून कल्याणकारी राज्याच्या संकल्पनेला चालना दिली. राजीव गांधी यांनी भारताला २१ व्या शतकाकडे नेण्यासाठी आधुनिक अर्थव्यवस्थेत जागतिकीकरणाचा स्वीकार केला. त्यामुळे नेहरूंचे समाजवादी प्रारूप मोडीत काढण्यात आले. भांडवलशाही अर्थव्यवस्थेमुळे इंदिरा गांधींच्या 'गरिबी हटाव' आणि २० कलमी कार्यक्रमांकडेही काणा- डोळा करण्यात आला. थोडक्यात, या काळात भारतीय राजकीय व्यवस्थेत कल्याणकारी राज्याचा दृष्टिकोन समाजवादाकडून भांडवलशाहीकडे अधिक झुकलेला आहे. आठव्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९९२-१९९७) २१ मे १९९१ रोजी राजीव गांधी यांची हत्या झाल्यानंतर पी. व्ही. नरसिंहराव यांच्याकडे पंतप्रधानपदाची सूत्रे आली. परंतु १९९० नंतरच्या काळात भारतीय अर्थव्यवस्थेत




अस्थिरता आली होती. देशातील कोसळलेली आर्थिक स्थिती, परकीय चलनाची घसरण, भाववाढ, औद्योगिक क्षेत्रातील मंदीची लाट अशी बिकट परिस्थिती निर्माण झाली होती. या काळात सरकारने रोजगार आणि जनतेच्या आरोग्यविषयक सुधारणांवर भर दिलेला होता, परंतु कल्याणकारी योजनांकडे मोठ्या प्रमाणावर दुर्लक्ष करण्यात आले होते. नवव्या पंचवार्षिक योजनाकाळात (१९९७--२००२) पंतप्रधान अटल बिहारी वाजपेयी, एच. डी. देवेगौडा, इंद्रकुमार गुजराल यांनी पायाभूत सुविधांवर अधिक भर दिला होता. राष्ट्रीय महामार्ग, नदीजोड प्रकल्प या योजनांना वाजपेयी सरकारने प्राधान्य दिले. दहाव्या पंचवार्षिक योजनाकाळात (२००२–२००७) पंतप्रधान मनमोहनसिंग यांनी खेड्यातील जनतेला पिण्याचे पाणी, सर्वांना रोजगार यांवर अधिक भर दिला. या कालखंडात मुक्त अर्थव्यवस्थेचा पुरस्कार केल्याने ग्राहकहिताद्वारे कल्याणकारी राज्याकडे पाहिले गेले. दहाव्या योजनेत सामाजिक सेवांवर ३,४७,३९१ कोटी रुपये खर्चाची तरतूद केली. अकराव्या पंचवार्षिक योजनाकाळात (२००७–२०१२) पंतप्रधान मनमोहनसिंग यांनी 'जागतिक आर्थिक धोरणांचा पूर्णपणे स्वीकार करून खुला व्यापार, परकीय कंपन्यांची गुंतवणूक किरकोळ रिटेल क्षेत्रातील थेट परकीय गुंतवणूक (एफ. डी. आय.) आणि आर्थिक सुधारणा कार्यक्रमावर अधिक भर दिल्यामुळे समाजवादी समाजरचनेतून कल्याणकारी राज्य स्थापन करण्याच्या मूळ संकल्पनेला भांडवलशाही अर्थव्यवस्थेचे आयाम प्राप्त झाले. काँग्रेससरकारने इंदिरा गांधी, पंडित नेहरू यांची कल्याणकारी राज्याची संकल्पना मोडूनतोडून टाकली. इतर वेळी भारतीय संविधानाच्या मूलभूत संरचनेचे समर्थन करणाऱ्या काँग्रेसनेच भारतीय संविधानातील 'कल्याणकारी राज्य' प्रस्थापनेचा खेळखंडोबा करून संविधानाच्या मूलभूत संरचनेला बाधा आणली, यामध्ये कोणतीही शंका वाटत नाही.

भारतातील कल्याणकारी राज्याच्या ध्रुवीकरणास १९७० च्या दशकापासून सुरुवात झाली. समाजातील सर्व प्रकारची विषमता नाहीशी करण्यासाठी शासनाने धोरण आखून त्याच्या अंमलबजावणीस सुरुवात केली. या काळापर्यंत नेहरूमॉडेलचा भारतातील कल्याणकारी राज्याच्या विचारधारेवर प्रभाव होता. परंतु १९९० नंतर जागतिकीकरणामुळे कल्याणकारी राज्याच्या दृष्टिकोनात मोठा बदल झाला. गरीब आणि अर्धविकसित विकसनशील देशांची स्वायत्तता धोक्यात आली. भारतासारख्या विकसनशील देशातील कल्याणकारी राज्याची संकल्पना भांडवलशाही आणि समाजवादाच्या कात्रीत सापडली, परकीय भांडवल, गुंतवणूक आणि खुल्या बाजारपेठेचाही भारतावर दुष्परिणाम झाला. जीवनाश्यक वस्तूंच्या किंमतीत वाढ, बाजारयंत्रणेमार्फत वस्तूंच्या किंमती ठरविणे, ग्राहककेंद्री दृष्टिकोन यांवर सरकारचे नियंत्रण राहिले नाही. अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य, शिक्षण, सामाजिक सुरक्षा यांची मोठ्या प्रमाणावर घसरण सुरू आहे. खुल्या आर्थिक व्यवस्थेमुळे भारताने कल्याणकारी राज्याकडे काणाडोळा केल्याचे स्पष्ट होते. भारताला आर्थिक संपन्नता प्राप्त व्हावी आणि खुल्या बाजारयंत्रणेचा दारिद्र्य-निर्मूलनासाठी प्रयत्न केला जावा, यासंबंधी डॉ. अमर्त्य सेन यांनी पुढीलप्रमाणे सूचना केली आहे, "सामाजिक कल्याणात वाढ होण्यासाठी केवळ वस्तूंच्या उत्पादनात वाढ होणे एवढे पुरेसे ठरत नाही. अशा विकासात सहभागी होण्यासाठी, त्याचा लाभ घेण्यासाठी आरोग्य, प्राथमिक शिक्षण यांचा पाठपुरावा करणे आवश्यक ठरते."[२४] भारतासारख्या विकसनशील देशापुढे कल्याणकारी राज्यप्रस्थापनेचे मोठे आव्हान उभे आहे. नव्वदीच्या दशकापासून खुल्या अर्थव्यवस्थेद्वारे खाजगी क्षेत्राकडून राज्याची ऐच्छिक कार्ये पार पाडली जात आहेत. यासंबंधी डॉ. अमर्त्य सेन भारतातील कल्याणकारी राज्यासाठी उपाय सुचविताना असे म्हणतात, की "राज्याने व्यक्ती व समाजाचा विचार करून सामान्य माणसाची कुवत व क्षमता वाढविण्यासाठी प्रयत्न करणे गरजेचे आहे. सामाजिक कल्याणाच्या वृद्धीसाठी दरडोई उत्पन्नाबरोबर आरोग्य व प्राथमिक शिक्षणसुविधांचे सार्वत्रिकीकरण करावे, शिक्षण व आरोग्य कल्याणासाठी शासनाने सरकारी खर्च व उत्पन्नाची फेररचना करावी. सरकारने कर आकारणीद्वारे मिळणारे उत्पन्न खर्च करताना, ज्यांचे हितसंबंध जोपासले जातात, त्यांचे लाभ कमी केल्यास शिक्षण, आरोग्यासाठी सामाजिक समता आणि न्याय प्रस्थापित करता येईल. अविकसित देशांतील लोकांचे








महत्तम कल्याण साध्य करण्यासाठी दीर्घकालीन बचतीचा दर वाढविण्यासाठी भांडवलप्रधान उत्पादनतंत्र योग्य मानून रोजगारवृद्धीच्या उद्दिष्टाला महत्त्व दिले, तर श्रमप्रधान उत्पादनतंत्राद्वारे अविकसित देशांनी आपले राज्यवित्तीय धोरण ठेवून कल्याणाचे महत्तीकरण करणे योग्य ठरू शकते. आणि सामाजिक कल्याणाच्या वृद्धीसाठी देशातील सामान्य माणसाचा मानवी चेहरा विचारात घेतल्यास अर्थशास्त्र व नीतिशास्त्रातील दरी कमी करता येईल." यावरून असे स्पष्ट होते, की जागतिकीकरणात मानवी कल्याणाचा चेहरा बदलला असून समाजवादी चेहऱ्याऐवजी तो भांडवलशाही झाला आहे.

वैश्विक राजकारणात कोणत्याही प्रकारची आवर्त-प्रवर्तने आली तरी, भारतीय संविधानाने अशा प्रकारच्या भक्कम तरतुदी केल्या आहेत, की जेणेकरून भारतात कल्याणकारी राज्य प्रस्थापित करता येईल. या अनुषंगाने डी. डी. बसू असे म्हणतात, की "लोकशाही प्रजासत्ताक राज्य जनतेच्या सर्वांगीण कल्याणासाठी असून, राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांतून कल्याणकारी राज्याचा अर्थ स्पष्ट होतो आणि उद्देशपत्रिकेतून त्याची हमी दिलेली आहे."[२५] कायदेतज्ज्ञ एम. सी. सेटलवाड कल्याणकारी राज्याच्या अंमलबजावणीसंबंधी असे म्हणतात, की "भारतीय संविधानातील राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांद्वारे आपण कल्याणकारी राज्याचे स्वप्न पूर्ण करू शकतो. त्यांची प्रामाणिक अंमलबजावणी झाली तर भारतात कल्याणकारी आदर्श राज्य निर्माण होऊ शकते."

भारतीय संविधानाचे शिल्पकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर कल्याणकारी राज्यासंबंधी असे म्हणतात, की "राज्य हे सामाजिक परिवर्तनाचे आणि सामाजिक कल्याणाचे साधन आहे. राज्यसमाजवादाचे स्वप्न साकार करण्यासाठी त्यांना राज्य आवश्यक वाटते. आजचे राज्य हे कल्याणकारी राज्य असून ते लोकांच्या इच्छेवर आधारित आहे."[२६] डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी राज्यसमाजवादाद्वारे कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करण्याचे स्वप्न उराशी बाळगले होते. कल्याणकारी राज्यासंबंधी के. संथानम असे म्हणतात, की "सध्याच्या राजकीय आणि आर्थिक संघर्षातून भारताचा प्रवास सुरू असून नव्या आर्थिक आणि राजकीय दृष्टीने भारताचा सहभाग वाढला आहे. लोकशाही विकेंद्रीकरण, राजकीय सत्ता आणि आर्थिक संसाधने यांद्वारे नवे आर्थिक धोरण आकारास येत आहे आणि ते कल्याणकारी राज्यासाठी मोठ्या प्रमाणावरील समूहाला वृद्धिंगत करणार आहे."[२७] यावरून असे स्पष्ट होते, की भारतात समाजवादी कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करण्याऐवजी भांडवलशाही अर्थव्यवस्थेतून कल्याणकारी राज्य स्थापण्याचा उद्देश दिसतो. परंतु भारतासारख्या विशाल खंडप्राय देशात, भारतीय संविधानातील उद्देशपत्रिका आणि राज्याच्या मार्गदर्शक तत्त्वांची काटेकोरपणे अंमलबजावणी केली, तर भारतात समाजवादी समाजरचनेद्वारे कल्याणकारी राज्याची प्रस्थापना निश्चित होऊ शकते. मात्र भांडवलशाही अर्थव्यवस्थेद्वारे पाश्चिमात्य मॉडेल किंवा प्रारूपांचा विचार केला तर देशाला अराजकतेला तोंड द्यावे लागेल, यात कोणतीही शंका वाटत नाही.

**संदर्भसूची :**


१. सोशल वेलफेअर प्लॅनिंग इन दि युनायटेड नेशन्स : कॉन्टेक्स्ट ऑफ नॅशनल डेव्हलपमेंट प्लॅन्स, न्यूयॉर्क (१९७०), पृ. ६५.

२. एनसायक्लोपिडीया ऑफ ब्रिटानिका : व्हॉल्यूम २३, पृ. ३८९.

३. राज्यशास्त्रकोश.

४. गर्गे, स. मा. (संपा.) : भारतीय समाजविज्ञान कोश, खंड २, पृ. १२९.

५. जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री (संपा.) : मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई (१९८५), खंड १२, पृ. १७९.

६. प्लॅंट रेमंड लेसर हॅरी पॅटर टॉयलर गॉडी : पोलिटिकल फिलॉसॉफी ॲण्ड सोशल वेल्फेअर, राऊटर्लज ॲण्ड केगल पॉल, लंडन बॉस्टन ॲण्ड हेनडी (१९८०), पृ. १.

७. कोसंबी डी. डी.: दि कल्चर ॲण्ड सिव्हि-लायझेशन ऑफ एनशंट इंडिया इन हिस्टॉरिकल आउट लाइन, विकास पब्लिकेशन, दिल्ली, पृ. ११३.

८. घोसलयु. एम.: समअस्पेक्ट्स ऑफ एनशंट इंडियन पोलिटिकल ऑर्गनायझेशन, पृ. २३३-२३४.

९. जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री (संपा.) : मराठी







विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई (१९८५), खंड १२, पृ. १७९.

१०. रोडे सोमनाथ : राजर्षी शाहू व्याख्यानमाला, २२ जून २०११, दैनिक सकाळ आवृत्ती, कोल्हापूर, दि.२४ जून २०११.

११. साळुंखे पी. बी. (संपा.) : राजर्षी शाहू गौरव ग्रंथ, शिक्षण व सेवा योजना विभाग, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई (१९८८), पृ. २९.

१२. चौसाळकर अशोक (संपा.) : टिळक आणि आगरकर यांचे राजकीय विचार, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर (२००८), पृ. १९-२२.

१३. कपूर अनुपचंद : सिलेक्ट कॉन्स्टिट्यूशन, एस. चांद ॲण्ड कंपनी लि., रामनगर, न्यू दिल्ली. पृ. ७९०.

१४. बाळ प्रकाश, बेडकीहाळ किशोर (संपा.) : भारतीय राजकीय प्रक्रिया आणि स्वरूप, आंबेडकर अकादमी, सातारा (२००२), पृ. २४.

१५. पूरणमल : मानवाधिकार, सामाजिक न्याय, और भारत का संविधान, पॉईन्टर पब्लिशर्स, जयपूर.

१६. लोकसभा सेक्रेटरीएट, न्यू दिल्ली (संपा.) : कॉन्स्टिट्यूअंट असेंब्ली डिबेट्स ऑफिशियल रिपोर्ट (२००३), खंड १, पृ. २.

१७. लोकसभा सेक्रेटरीएट, न्यू दिल्ली (संपा.) : कॉन्स्टिट्यूअंट असेंब्ली डिबेटस् ऑफिशियल रिपोर्ट (२००३), खंड ७, पृ. ५९.

१८. लोकसभा सेक्रेटरीएट, न्यु दिल्ली (संपा.) : कॉन्स्टिट्यूअंट असेंब्ली डिबेट्स ऑफिशियल रिपोर्ट (२००३), खंड २, पृ. २६९-२७३.

१९. लोकसभा सेक्रेटरीएट, न्यू दिल्ली (संपा.) : कॉन्स्टिट्यूअंट असेंब्ली डिबेट्स ऑफिशियल रिपोर्ट (२००३), खंड ७, पृ. ५११-५१२.

२०. लोकसभा सेक्रेटरीएट, न्यू दिल्ली (संपा.) : कॉन्स्टिट्यूअंट असेंब्ली डिबेट्स ऑफिशियल रिपोर्ट (२००३), खंड ७, पृ. ५१२.

२१. लोकसभा सेक्रेटरीएट, न्यू दिल्ली (संपा.) : कॉन्स्टिट्यूअंट असेंब्ली डिबेट्स ऑफिशियल रिपोर्ट (२००३), खंड २, पृ. ३१७-३१८.

२२. ऑस्टीन ग्रॅनव्हिल : दि इंडियन कॉन्स्टिट्यूशन कॉर्नर स्टोन ऑफ ए नेशन, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस (२००७), पृ. २७.

२३. महाराष्ट्र शासन : भारतीय संविधान, २६ सप्टेंबर २००६ पर्यंत फेरबदल केल्याप्रमाणे भाग ४, पृ. १७.

२४. ककडे विजय : प्रबोधन प्रकाशन ज्योती, तिसऱ्या जगाच्या कल्याणाचा कैवारी, अमर्त्य सेन, पृ. ३७.

२५. बसू डी. डी. : इन्ट्रोडक्शन टु द कॉन्स्टिट्यूशन ऑफ इंडिया, वधवा ॲण्ड कंपनी लॉ पब्लिशर्स, आग्रा (२००४), पृ. २४.

२६. गवळी, टी. ए. व इतर संपा. : बाबासाहेब आंबेडकर (१९९१), पृ. २६०-२६१.

२७. टौरी कोमल (संपा.) : गांधीयन ॲप्रोच टू दी प्रेझेंट क्रायसेस, खादी ग्रामोद्योग, दि जर्नल ऑफ रुरल इकॉनॉमी, खंड १. (१९९४).

★★★

# कोणता मानू चंद्रमा?

स्मिता नितीन लाळे

**हा चंद्र**

त्या चंद्राचें या चंद्राचें
मुळींच नाहीं काही नातें
त्या चंद्रावर–
अंतरिक्षयानांत बसोनी
माकड मानव कुत्रा यांना
जातां येते;
या चंद्राला वाटच नाही
एक नेमकें ठिकाण नाही
हाही नभाचा मानकरी पण–
लक्ष मनांच्या इंद्रगुहांतुनि भटकत राही.

नटखट मोठा ढोंगीसोंगी
लिंबोणीच्या झाडामागें
केव्हां लपतो मुलाप्रमाणें
पीन स्तनांच्या दरींत केव्हां
चुरून जातो फुलाप्रमाणें
भग्न मंदिरावरी केधवा
बृहस्पतीसम करतो चिंतन
कधी बावळा तळ्यांत बुडतो
थरथर कापत बघतो आंतुन
तटघुमटावर केव्हां चढतो,
कधी विदूषक पाणवठ्यावर
घसरुनि पडतो,
कुठे घराच्या कौलारांतुनि
उतरुनि खाली शेजेवरती
तिथे कुणाची कमलपापणी
हळूच उघडुन नयनी शिरतो,
कधी कुणाच्या मुक्त मनस्वी प्रतिभेसाठी
द्वारपाल होऊन जगाच्या
रहस्यतेचें दार उघडतो.
अशा बिलंदर अनंतफंदी
या चंद्राचें
त्या चंद्राशी कुठले नातें?
त्या चंद्रावर
विज्ञानाची शिडी लावुनी
शास्त्रज्ञांना चढता येते
रसिक मनांना या चंद्राला
पळभर केव्हां
जळांत वा डोळ्यांतच केवळ
धरता येते.

– कुसुमाग्रज

वाचलीत ना ही कविता? या कवितेत सूर्य-पृथ्वी यांचं विफल प्रेम नाही, की अहि-नकुल यांची जीवघेणी झुंज नाही. 'हा चंद्र'मध्ये असे काहीच नाही. कवीचा चंद्र आणि शास्त्रज्ञांचा चंद्र असे दोन वेगवेगळे चंद्रही नाहीत; फक्त वेगवेगळी आहे ती त्यांची दृष्टी.

चंद्र, चांदण्या, सूर्य, पृथ्वी, वृक्ष, नदी या सर्व निसर्गातील घटकांवर कुसुमाग्रजांच्या कविता आहेत. चंद्रावर जवळजवळ सर्वच कवींनी प्रेम केलं, कविताही केल्या. संशोधकांनीही प्रेम केलं, शोध लावले. त्याच्यावर वसती करण्याच्या प्रयत्नात ते आहेत, ते काय उगीच? जर त्यांचा प्रयत्न सफल झाला, तर तुम्ही, आम्ही, कवी, रसिक सगळेच त्यांच्याबरोबर जाऊच की! पण सगळेच संशोधक नसतात ना! काही तुमच्या आमच्या सारखेही असतातच की! चंद्र हा सगळ्यांच्या प्रेमाचा आणि संशोधनाचा विषय; फक्त प्रेम करण्याचे मार्ग वेगवेगळे.

'हा चंद्र'मध्ये तो आणि ती नाहीतच; पण समजा, आपण जर मानलं, 'तो' संशोधक आणि 'ती' कवयित्री आहे.– तर ती दोघे चंद्राकडे कसे बघतील? दोघांना चंद्र कसा दिसत असेल?

गंमत अशी, की तिला चंद्र वाटतोय छान, गोजिरवाणा; पण त्याचं लक्ष चंद्राकडे नाही आणि

तिच्याकडेही नाही. म्हणूनच तर ती रुसलीय. आपले मुख ह्याला चंद्रमाप्रमाणे वाटतच नाही. आपल्या प्रेमाची कबुली तो देतो कधीकधी; पण साक्षीला चंद्र वगैरे ठेवून कधीच नाही. छान तळ्याकाठी बसलोय आम्ही. मला चंद्र तळ्यात दिसतोय, पण त्यालाही दिसला असता तर? मग त्याने म्हटलं असतं– हा तळ्यातला चंद्रमा खरा की माझ्या शेजारचा? पण शक्यच नाही हे सगळं. त्याला आपलं मन कळणारच नाही कधी.

त्याचं लक्ष आहे चंद्राकडे आणि तिच्याकडेही; पण त्याची दृष्टीच वेगळी. विज्ञानाची विद्यार्थिनी नाही ही! तिला काय कळणार चंद्राचं खरं रूप? मला माहीत आहे. चंद्रप्रकाशाचं, चांदण्यांच्या लुकलुकण्याचं गूढ, ग्रहांच्या गुरुत्वाकर्षणाची कारणे. हीसुद्धा आपल्यासारखी संशोधक असती तर? हिचे सिद्धान्त, माझे सिद्धान्त यांतून जन्माला आला असता एक नवाच निष्कर्ष. सर्व वैज्ञानिक घटना ह्या. काव्यबिव्य काहीच नाही. त्यामागे आहेत काही शास्त्रीय कारणं, काही घटना. दिवसरात्र संशोधनात बुडालो असतो आपण दोघं. चंद्र, चांदण्या, आकाश यांमागलं रहस्य शोधून चकित केलं असतं एकमेकांना आणि आश्चर्यचकित केलं असतं जगाला. एक ना एक दिवस आपण चंद्रावर जाऊ. तिथे जीवसृष्टी आहे, जीवनाचा बहर आहे, हेही आपण दाखवून दिलं असतं; पण या सगळ्यासाठी मला तिची साथ हवी आहे. तिला मात्र या कशाचीच जाणीव नाहीये. तिला आपलं मन कधी कळणार?

कुसुमाग्रजांनी कवितेत तसे स्पष्ट म्हटले असो किंवा नसो; आपल्या मनात आपणच चित्रित केली खरी ही दोघं. तो आहे संशोधक, ती आहे कवयित्री. कविता लिहिताना कविराजांनी दोघांचे चंद्र मात्र नक्कीच उलगडले आहेत. चंद्र एकच, पण त्याला ते 'या' चंद्राचे, 'त्या' चंद्राचे असे संबोधतात. 'या' ह्या शब्दातून भावनिक अंतर आणि मोजपट्टीवरचं अंतर ही दोन्ही जवळीक वाढवतात. 'त्या' शब्दातून मात्र दोन्ही अर्थांनी दुरावा निर्माण करतात. आता असं आहे, की कुसुमाग्रज हे कवीच. त्यांनी कवीच्या चंद्राला 'या चंद्राला' असे म्हणून जास्त जवळीक साधणं साहजिकच आहे. संशोधकाच्या चंद्राला त्यांनी 'त्या चंद्राला' असं म्हणणं ओघानंच आलं.

कवीचा चंद्र कसा आहे, हे त्यांना ठाऊक होतेच, पण शास्त्रज्ञांचा चंद्रही त्यांना पक्का ठाऊक आहे. आपला चंद्र मनात जपताजपता ते सहजच वैज्ञानिकांचा चंद्र हुडकून काढतात. आपल्या कवितेत दोघांनाही बंदिस्त करतात. कुसुमाग्रजांच्या 'पृथ्वीचे प्रेमगीत'मध्येही शास्त्र आणि काव्य यांची मजेदार गुंफण दिसते. वैज्ञानिक सत्यालाही भावकाव्याचं स्वरूप येतं. कवी असूनही ते प्रतिमांकडे शास्त्रीय भान ठेवून बघतात. उगीचच कल्पनेच्या भराऱ्या नसतात. ह्या कवितेतही 'अंतरिक्षयानातून झाडं, फुलपाखरं, पक्षी, फुलं, नदी, सागर यांनाही जाता येतं', असं नाही म्हणत ते. मग त्या कल्पनेच्या भराऱ्याच झाल्या असत्या. आपल्याही मनात 'हे काहीतरीचं हं! असं कधी होईल का?' असं नक्कीच आलं असतं. कल्पनांना वास्तवाचं भान असल्यामुळे आपल्याला त्या कल्पनांची गंमत वाटते. 'पृथ्वीचे प्रेमगीत'मध्येही शेवटी त्या दोघांचे प्रेम सफल होतं, असं काही अतिरंजित नाहीच म्हणत ते. 'हा चंद्र' कवितेत सुरुवातीलाच कविराजांनी आपल्याला सांगून टाकलं आहे, 'या चंद्राचे त्या चंद्राचे मुळीच नाही काही नाते.' या पहिल्या दोन ओळी वाचल्यावर आपल्याला वाटते, हे दोन चंद्र कुठले? मग लक्षात येते, चंद्र एकच आहे, पण शास्त्रज्ञ आणि कवी यांच्या मनात त्याचे वेगवेगळे प्रतिबिंब आहे. शास्त्रज्ञांना त्याचा ठावठिकाणा माहीत आहे. कवीचा चंद्र मात्र एकाच वेळी कुठेही असू शकतो. अगदी तरुणीच्या शय्येवर जाऊन तिची कमलपापणी उघडून नयनी शिरतो. असा तो बिलंदर, अनंतफंदी.

अशा या चंद्राचा शास्त्रज्ञ मात्र कब्जा घेतात. अंतरिक्षयानात बसून सहलीला गेल्यासारखे चंद्रावर जाऊन येतात. एवढेच नाही, तर तिथली मातीही घेऊन येतात. ह्या सगळ्यासाठी त्यांना खूप खटाटोप मात्र करावा लागतो. सहजासहजी काही हे होत नाही. कवी किंवा रसिकाला मात्र या चंद्राला डोळ्यात किंवा जळातही धरता येते. तो त्यांच्या एवढा समीप असतो. त्याला औक्षणही करावंसं वाटतं. नल-दमयंती प्रेमकाव्यात तर रघुनाथपंडित यांनी चंद्राचं वर्णन तसंच केलंय. अष्टमीचा








चंद्र नलाला दमयंतीच्या भालप्रदेशासारखा भासतो. नल चिमटीत कुंकू घेतो, हात चंद्राच्या दिशेने उभारतो आणि चंद्रावरच कुंकू रेखायचा प्रयत्न करतो. हलकेच थरथरली असेल दमयंतीची काया; आणि तिच्या कमलपापणीतला चंद्रदेखील. इतका खरा, इतका जवळ, इतका निकट फक्त कवीचाच चंद्र असू शकतो ना? कुसुमाग्रजही या चंद्रातच जास्त रमतात. त्यांना तोच जवळचा वाटतो. त्याचं रूप इतकं लोभसवाणं करतात, की आपल्यालाही वाटत जातं, अरे ! खरंच हा लहान मुलासारखा नटखट, खट्याळ, सोंगीढोंगी आहे. त्यांनी कधी त्याला विदूषक केलंय तर कधी बृहस्पती केलंय.

लहान वयापासून कवी आणि शास्त्रज्ञ यांचा चंद्र एकच. दोघेही बाळ असताना दोघांनाही हाच चंद्र तर दाखवला होता त्यांच्या मातेनं. जसे ते मोठे झाले तशी त्यांची दृष्टीदेखील बदलत गेली. मग नंतर कुणी चंद्रावर संशोधन करत राहतं, तर कुणी कविता करत राहतं.

एवढं मात्र नक्की, की वैज्ञानिकांना चंद्र दाखवला तो मात्र कवींनीच. चंद्रावरची गाणी रचणाऱ्या कवींनी त्याचं सौंदर्य दाखवलं. त्याचं आणि कमळाचं नातं, त्याचं आणि समुदाचं नातं, फांदीआडून दिसणारा चंद्र, चतुर्थीची कोर, लुकलुकणाऱ्या चांदण्याबरोबर पौर्णिमेचा पूर्ण चंद्र. शांताबाई दुरावलेल्या प्रेमिकांना 'तोच चंद्रमा' दाखवतात. कवी 'बी' च्या कवितेत रुसलेली लेक हसते, गालावर खळी पडते आणि 'बी'ना सुचतं, 'लाट उसळोनी जळीं खळें व्हावे, त्यांत चंद्राचे चांदणे पडावे'. केशवसुत तर इशाराच देऊन गेले, 'आम्हाला वगळा गतप्रभ झणी होतील तारांगणे'. कवींना असे वगळून चालणारच नाही.

चंद्रच कशाला? सगळा निसर्गच कवींनी, साहित्यिकांनी कवेत घेतला. सगळ्यात जास्त प्रेम पावसावर केलं असावं कवींनी. ओल्या मातीचा सुगंध शब्दांना आला आणि शब्दांचा सुगंध दरवळला. मग पाऊस सुंदर दिसू लागला. सर्वांत त्रासदायक ऋतू सर्वांत आल्हाददायक वाटू लागला. धुकं? आरोग्याला वाईट; पण त्यावरही कविता झाल्या. 'धुक्याची चादर ओढून गाव शांत झोपलं होतं....' वगैरे काव्यमय वर्णनं वाचल्यावर त्यात सौंदर्य दिसू लागलं. नाहीतर काय, नदी ही नदी आहे, चंद्र-सूर्य, आकाश, चांदण्या, झाडं, फुलं, पक्षी आहेत, हो आहेत; पण कवींनी नवी दृष्टी दिली. ह्या गोष्टी सुंदर आहेत. रंगीत आहेत, कोमल आहेत. हा निसर्ग आहे, त्याला राग आहे, लोभ आहे, उधाण आहे, ओहोटी आहे. हे सर्व आहे. कवींनी त्यांना मानवी रूप, मानवी भावना दिल्या आणि जगच सुंदर झालं. मनांमनांतून कोमल भावना फुलल्या. प्रेम, वात्सल्य, आपुलकी या भावनांना निसर्गाशी जोडलं. ज्यांच्यापर्यंत हे पोचलं त्यांतल्या काहींना ह्या घटनांमागली शास्त्रीय कारणं शोधावी असं वाटू लागलं. निसर्गाच्या ह्या आस्वादातून विज्ञानकथांची निर्मिती झाली. त्यातून शोध लागले. लेखक ज्यूल व्हर्नच्या कल्पनाविश्वातून विज्ञानकथा जन्माला आल्या. त्यातून संशोधक निर्माण झाले. रोबोट, अंतरिक्षयान, सॅटलाइट यांची निर्मिती झाली.

असं हे निसर्गाच्या आकर्षणाचं बीज रुजतं. निसर्ग कोणाच्या मनात कुठलं बीज ठेवेल, हे नाही सांगता येत. रुजल्यावर त्यातून कधी कवितेचं झाड उगवतं, तर कधी शोधाचं उगवतं. अशी होते निर्मिती. निसर्गाचा सौंदर्यास्वाद कवी कवितारूपाने मांडतो, तर संशोधकाचा विज्ञानस्वाद सिद्धान्तरूपाने आपल्यासमोर येतो. मुळात दोन्ही अस्तित्वात आहेतच. बीजरूपाने असलेलं सौंदर्य हे 'शिव' मानलं, तर नामरूपाने अस्तित्वात येणाऱ्या त्याच्या जाणिवेला 'शक्ती' मानावं लागेल. दोन डोळ्यांनी एक दृश्य दिसावं तशी आपल्याला सृष्टी दिसते. निर्मिती काव्याची असो, सिद्धान्ताची असो किंवा दोघांनाही सामावून घेणाऱ्या कुठल्याही कलाकृतीची असो; अशी कलाकृती कधी-कधी श्रेष्ठ ठरते. ती बघितल्यावर त्याच्या मुळाशी काय आणि कोण आहे, हे आपल्याला लगेच कळतं.

रसिकांनी ह्या कवितेकडे आस्वादकाच्या नजरेने पाहिलं तर लगेच लक्षात येतं, 'हा चंद्र' च्या मुळाशीही असंच काहीसं असावं. रसिकाला ही कविता आवडून जाते. का आवडते ही कविता आपल्याला? चंद्र आपल्याला आवडतो म्हणूनच फक्त आवडते का? आपल्याला आवडते ती त्यातल्या लयीमुळे. छंद, मात्रा, वृत्त असं काही नसलं, तरी कवितेत एक अर्थाची लय सापडते. कुसुमाग्रजांच्या बऱ्याचशा कवितांमध्ये अशी लय आहे. 'आगगाडी आणि जमीन'मध्ये तर ही लय आपल्याला बरोबर सापडते. 'हा चंद्र'मध्येही अशीच गतिमानता

आहे. कविता म्हणताना गतिमानता, लय आपल्या मनात प्रगटते. कशी? चंद्र कधी लिंबोणीच्या झाडामागे, कधी भग्न मंदिरावर, कधी तळ्यात, कधी घुमटावर, कधी पाणवठ्यावर असा सतत पळत असतो. त्याच्या पळण्यातली लय कवितेत येते, आपल्याही मनात मग चंद्राचा लपंडाव सुरू होतो. कधी तो कवीचा, रसिकाचा होतो, तर कधी तो वैज्ञानिकाचा होतो. इथे आपल्याला दिसते कविराजांच्या कल्पनेचे नावीन्य. कुसुमाग्रज कवी आणि वैज्ञानिक ह्या दोघांना एकाच कवितेत बेमालूमपणे बंदिस्त करतात; अगदी आपल्या नकळत. झुकतं माप मात्र मिळतं 'या चंद्राला'. त्यातल्या तरल कल्पना आणि शब्दांचं अचूकपण आपल्याला बांधून ठेवतं. नुसतंच बांधून ठेवत नाही, तर आपली क्षणभर करमणूक ही कविता करते. आपल्याला गंमतच वाटत जाते.प्रत्येक कविता बोधपर, भव्य आशय सांगणारी असायला हवी, असं काही नाही. ती तशी असेल तरच ज्यांना आवडते, त्यांना आवडो. निसर्गातल्या विराट प्रतिमांमधून सखोल सामाजिक आशय असलेल्या कुसुमाग्रजांच्या कविता आहेतच. त्याही आवडतातच.

चंद्र, अंतरिक्षयान, भग्न मंदिर, घर, तळं ह्या सर्व बाह्य घटनांना स्पर्श करत कुसुमाग्रजांची कविता कशी अलगदपणे अंतरंगात प्रवेश करते. हा चंद्र आपल्या इतक्या जवळ येतो, की सहजपणे आपल्या डोळ्यात प्रवेश करतो. एकदा का डोळ्यात प्रवेश केला, की अंतरंगात प्रवेश व्हायला कितीसा वेळ? आपल्याला त्याचा अनुभव आहेच. अशा तरल भावावस्थेत चंद्राकडे बघत असताना एखाद्या प्रियकराला संदेह निर्माण होतच असेल आणि 'ससंदेह अलंकार' प्रियतमेच्या गळ्यात अलगद पडत असेल. कसा? गु. ह. देशपांडे यांनी कवितेतूनच सांगितलं आहे तसा–

कोणता मानू चंद्रमा?  
भूवरीचा की नभीचा  
शशांकमुख की मुखशशांक ते  
निवडतील निवडोत जाणते  
मानी मन त्या सुखद संभ्रमा  
कोणता मानू चंद्रमा?

आपला संभ्रम मात्र वेगळाच आहे. आपण म्हणू या, निवडू कोणता चंद्रमा, कवीचा की शास्त्रज्ञाचा?

★★★

---



अनुक्रमणिका






# लोकसंस्कृतीचे भाष्यकार : डॉ. द. ता. भोसले

माधव पुटवाड

विद्यार्थिप्रिय शिक्षक, चिंतनशील ललित लेखक, सम्यक समीक्षक, लोकसंस्कृतीच्या वैविध्यपूर्ण रंगरूपाची आस्थेने अक्षरनोंद करणारे व तिच्या स्वरूपविशेषांचे वस्तुनिष्ठ विश्लेषण करणारे अभ्यासक अशा विविध भूमिकांतील प्रा.डॉ.द.ता.भोसले हे नाव बहुपरिचित आहे.

डॉ.द.ता.भोसले यांच्या विविध वाङ्मयप्रकारांतील ललितलेखनाने आणि समीक्षणात्मक वा वैचारिक लेखनाने मराठी साहित्य अधिक समृद्ध करण्यातील आपला वाटा नोंदवला आहे. विशेषतः लोकसंस्कृतीच्या विविधांगी स्वरूपाची नोंद व विश्लेषण करणारे त्यांचे लेखन अत्यंत महत्त्वाचे ठरते. तो एक सांस्कृतिक ठेवा आहे. महाराष्ट्रातील ग्रामजीवनाचा सामाजिक आणि सांस्कृतिक इतिहास समजून घेण्याच्या दृष्टीने डॉ.द.ता.भोसले यांचे लेखन अत्यंत मौलिक ठरते.

डॉ.द.ता.भोसले यांच्या लोकसंस्कृतीच्या संदर्भातील लेखनाचा विचार प्रामुख्याने दोन अंगांनी करता येईल.एक म्हणजे त्यांनी प्रत्यक्ष लोकव्यवहारातील प्रचलित रूढी-प्रथा-परंपरा-श्रद्धा-अंधश्रद्धा-कल्पनादींची म्हणजेच लोक-संस्कृतीची नोंद केली आहे. दुसरे म्हणजे लोकसंस्कृती म्हणजे काय? तिच्या अस्तित्वात येण्याचे, जडणघडणीचे, लोकव्यवहारात प्रचलित होण्याचे आणि भल्याबुऱ्या रूपांसह आणि बदलांसह लोकजीवनाबरोबरच्या प्रवासाचे विश्लेषण केले आहे.

लोकसंस्कृतीच्या विविधांगी स्वरूपाची, समाज-जीवनातील तिच्या वावराची, समाजजीवनाला चैतन्यशील करण्याच्या तिच्यातल्या सामर्थ्याची नि समाजजीवनाला योग्य वळण लावू शकणाऱ्या तिच्यातल्या मूल्यात्मक सत्त्वाची व नैतिक तत्त्वाची अक्षरनोंद करताना डॉ.द.ता.भोसले अत्यंत भावविवश होतात. लोकसंस्कृती-विषयीचा त्यांच्या मनातील आपलेपणा शब्दाशब्दांतून उमटतो. मात्र जेव्हा ते लोकसंस्कृतीच्या भल्याबुऱ्या स्वरूपाचे विश्लेषण करतात, तेव्हा ते तेवढेच वस्तुनिष्ठ होतात. प्रत्यक्षवादी होतात. श्रद्धाभावापेक्षा बुद्धिप्रामाण्यवादी भूमिका समर्थपणे पेलतात. आस्थाशून्यपणे गुणदोषविवेचन करतात.

**संस्कृती व लोकसंस्कृती : संकल्पना**

डॉ.द.ता.भोसले यांनी संस्कृतीच्या स्वरूपाचे समर्पक विवेचन केले आहे. संस्कृती म्हणजे काय, हे सांगताना त्यांनी लिहिले आहे, की "कोणत्याही संस्कृतीच्या गाभ्यामध्ये काही अटळ स्वरूपाच्या बाबी त्या संस्कृतीचे अधिष्ठान म्हणून वावरत असतात. अदृश्य शक्तीविषयीचे भय, त्यातून निर्माण झालेल्या विविध देवदेवता; या देवदेवतांना प्रसन्न करण्यासाठी तयार केलेल्या विधी आणि उपासना- पद्धती, त्यांना तात्त्विक पाया देणारी धर्मकल्पना, त्या धर्माला लाभलेले तत्त्वज्ञान, त्या तत्त्वज्ञानाचा प्रचार-प्रसार होण्यासाठी निर्माण होणाऱ्या कला आणि साहित्य; निसर्ग, पर्यावरण, उत्पादन, परंपरा, रूढी यांतून साकार झालेली जीवनशैली ; त्या जीवनशैलीस आवश्यक असणारे मनोविनोदन आणि मनोविनोदनासाठी तयार केलेले सण, सोहळे, खेळ, गाणी, नृत्य आणि या साऱ्यांतून साधले जाणारे सहजीवन आणि यासाठी आवश्यक असणारी मूल्ये या साऱ्यांचा झालेला आविष्कार म्हणजे संस्कृती, असे आपणास स्थूलपणे म्हणता येईल. दुसऱ्या शब्दांत असे म्हणता येईल, की सर्जन, संरक्षण, श्रमपरिहार, सहकार आणि सुखप्राप्ती या पाच गोष्टी कोणत्याही संस्कृतीच्या गाभ्यामध्ये नांदत असतात." (लोकसंस्कृती : बंध-अनुबंध, पृ.२५) 'संस्कृतीच्या पाऊलखुणा'या पुस्तकात ते लिहितात "धर्म, अध्यात्मासह समग्र अंतर्बाह्य जीवनाच्या उन्नत अवस्थेचे परंपरेने विकसित होत गेलेले प्रतीक म्हणजे संस्कृती होय. म्हणजे संस्कृतीच्या संकल्पनेत भौतिक सृष्टीतील मानवाने हवे तसे घडविलेले परिवर्तन व त्याबरोबर केलेले वा घडलेले मानसिक परिवर्तन हातात हात घालून येत असते. मी कोण आहे, मी कसा जगतो नि मी कशाच्या आधारे

जगतो? या तीन प्रश्नांची उत्तरे जिच्यातून मिळतात, तिला आपण संस्कृती म्हणायला हरकत नाही.... आपले जीवन अधिक सुखी, अधिक आकर्षक, अधिक समृद्ध, अधिक निरामय नि स्थिर आणि मूल्याधिष्ठित होण्यासाठी केलेली धडपड - केलेली नवनिर्मिती म्हणजे संस्कृती होय. ....मानवी जीवनयात्रेची पद्धती ज्या सामाजिक आचार, विचार, श्रद्धा, वाङ्मय नि कला यांमधून अभिव्यक्त होते, तिला संस्कृती म्हणायला हरकत नसावी." (मनोगत.) डॉ.द.ता.भोसले यांच्या या नोंदीतून संस्कृती म्हणजे काय, ते अधोरेखित होते. संस्कृतीच्या व्यापकतेचे, तिच्या जडणघडणीचे व लोकव्यवहारातील तिच्या असण्या-जाणवण्याचे स्वरूप उलगडते.

पृथ्वीच्या पाठीवरील कोणत्याही समूहाची संस्कृती असो; ती त्या समूहाच्या जगण्याचा भाग होऊन आकाराला येते आणि जगण्याचा भाग होऊन त्या त्या समूहाच्या जगण्याबरोबर प्रवास करत असते. अशा संस्कृतीचे स्वरूप केवळ चांगले असते असे नाही. त्यात मनुष्य-जीवनाला उपयुक्त ठरणारी उदात्त जीवनमूल्ये असतात, व्यवहारज्ञान असते; त्याचबरोबर अज्ञान, मनुष्यविघातक रूढी-परंपरा नि मूल्यकल्पनाही असतात. कोणत्याही संस्कृतीला त्या त्या काळाचे संदर्भ असतात. त्या त्या लोकसमूहाच्या सभोवतालच्या सामाजिक परिस्थितीचे, भौगोलिक पर्यावरणाचे भलेबुरे परिणाम त्या समूहाच्या जीवनव्यवस्थेवर होतच असतात. त्यातूनच त्यांची जीवनव्यवस्था आकाराला येते आणि त्या लोकांच्या नांदण्याबरोबर प्रवास करत असते. त्या व्यवस्थेच्या भल्याबुऱ्या रूपाचे भलेबुरे परिणाम त्या त्या समूहातील सदस्यांच्या वाट्याला येत असतात. आणि जगण्यातला अपरिहार्य भाग म्हणून सामान्यतः त्या समूहातील सदस्यांकडून त्या त्या भल्याबुऱ्या रूपाचा स्वीकार केला जात असतो. लोकजीवनाचा भाग होऊन वावरणारी त्या त्या लोकसमूहाची ही व्यवस्था म्हणजेच त्या लोकांची संस्कृती असते. तिलाच लोकसंस्कृती म्हणता येईल.

मात्र जेव्हा जाणीवपूर्वक एखाद्या व्यवस्थेची मांडणी करून ती व्यवस्था एखाद्या समूहांवर लादली जात असते, तेव्हा अशा व्यवस्थेस लोकसंस्कृती म्हणता येत नाही. अशी व्यवस्था/संस्कृती तुलनेने अधिक प्रगल्भ, अधिक निर्दोष, मानवी जगण्यासाठी अधिक उपयुक्त वा उपकारकही असू शकते वा याच्या उलटही असू शकते. मात्र ती लोकसंस्कृती नसते, ती लोकजीवनाचा भाग झालेली नसते तर लोकजीवनाचा भाग करण्याचा प्रयत्न केला जातो वा ती सत्तेच्या वा धर्माच्या आधाराने लोकांवर लादली जाते. असे हे लादणे यशस्वी वा अयशस्वी होऊ शकते. काळाच्या ओघात लोक तिचे लादणे विसरून जाऊ शकतात. अशा व्यवस्थेविषयी आपलेपण निर्माण होऊ शकते.

जेव्हा एखादा विशिष्ट समूह त्याचे विचार, त्याचे तत्त्वज्ञान दुसऱ्यावर लादत असतो, तेव्हा मूळ जीवनपद्धती विकृत होते. अर्थात अशा प्रक्रियेत जेव्हा एखादी विशिष्ट जात, समूह, पंथ, धर्म कार्यरत असतो, तेव्हा अशा व्यवस्थेचे नाते त्या जात, समूह, पंथ, धर्माशी जोडून नामकरण केले जाते. वैदिक संस्कृती, ब्राह्मणी संस्कृती, मुस्लिम संस्कृती इ. नावे अशा प्रक्रियेतूनच आलेली आहेत. अशी व्यवस्था जेव्हा एखाद्या समूहावर लादली जाते, तेव्हा तो समूह अशी व्यवस्था स्वीकारतो का? स्वीकारल्यास का? त्यांचे मूळ पारंपरिक जीवन ते सोडून देतात का? अशा नव्या व्यवस्थेच्या स्वीकारात फायदे असतात की तोटे? अशा प्रश्नांची सर्वमान्य आणि सर्वांना लागू होणारी उत्तरे कोणालाही देता येणार नाहीत. त्या तशा उत्तरांची चर्चा येथे अपेक्षित नाही. मात्र मानवी जीवनप्रवासात असे घडत असते, ही बाब जाणीवपूर्वक लक्षात घेतली पाहिजे. हेही लक्षात घेणे आवश्यक आहे की ही लादलेली नवी जीवनव्यवस्था मूळ जीवन-व्यवस्थेपेक्षा वेगळी असते. शिवाय अशी व्यवस्था विशिष्ट जात, समूह वा पंथपुरस्कृत असल्याने सामान्यतः त्या समूहातील काहींचा सन्मान करणारी तर अनेकांना अपमानित करणारी, काहींचे भौतिक जगणे समृद्ध करणारी तर अनेकांचे जगणेच असह्य करणारी ठरू शकते वा याच्या उलटही असू शकते. अशा व्यवस्थेच्या निर्मिति-प्रक्रियेत कार्यरत आणि प्रस्थापनेसाठी प्रयत्नरत असणाऱ्या समूहाच्या भूमिकेनुसार अशा व्यवस्थेचे भलेबुरे स्वरूप ठरते. या प्रक्रियेतील त्या विशिष्ट जात, समूह, पंथ वा धर्माची माणसे जर लोभी, अज्ञानी नि स्वार्थी असतील, तर अशा व्यवस्थेचे मनुष्यविघातक स्वरूप अधिक

उमटून दिसते. भारतातील वैदिक-ब्राह्मणपुरस्कृत व्यवस्था तशी ठरल्याचे उदाहरण आपल्यापुढे आहे.

भारतीय संस्कृती अत्यंत प्राचीन आहे. भारत-भूमीवरील मानवी समूहाचे जगणे स्थिर आणि संपन्न होत गेले, त्याचबरोबर त्यांची जीवनव्यवस्थाही आकाराला येत गेली. स्वतःतलेच दोष पचवत ती व्यवस्था अधिक प्रगल्भ होत गेली. अशां या येथल्या लोकजीवनात प्रचलित लोकसंस्कृतीचे समृद्ध अस्तित्व अनेक अभ्यासकांनी मांडले आहे. म.फुले, डॉ.बाबासाहेब आंबेडकर, स.रा.गाडगीळ, डॉ.आ.ह.साळुंखे, रा.चिं.ढेरे इ. मराठी भाषेतील अभ्यासक अनेकांना परिचित आहेत.

आर्यांच्या आगमनानंतर मात्र भारतभूमीवरील आदिम संस्कृतीचे सदस्य असणाऱ्यांच्यात आणि आर्य यांच्यात संघर्ष झाला असण्याची शक्यता नाकारता येत नाही. वेदांच्या निर्मितिकाळात आणि नंतर आजपर्यंत आणि आजही वैदिकपूर्व संस्कृतीला बदनाम करण्याचे आणि वैदिक संस्कृती येथल्या लोकजीवनावर लादण्याचे, तिच्या प्रचार-प्रसाराचे नि संक्रमणाचे जाणीवपूर्वक प्रयत्न झाल्याचे व होत असल्याचे वास्तव नाकारता येणार नाही. डॉ.द.ता.भोसले यांनी या सांस्कृतिक संघर्षाचे आणि संघर्षानंतर समन्वयातून आकाराला आलेल्या लोक-संस्कृतीचे यथार्थ विवेचन केले आहे. त्यांच्या मते "आर्यांच्या आधी इथे जी एक समृद्ध संस्कृती नांदत होती, तिच्या अधिष्ठानावर लोकसंस्कृती उभी आहे. भारतात वैदिक आर्यांचे आगमन झाल्यावर येथील आर्येतर जमातींशी त्यांचा संघर्ष झाला. हा संघर्ष जसा दोन जमातींमधील होता, तसाच दोन संस्कृतींमधीलही होता. या संघर्षात जसे भूमीवरील स्वामित्व हे एक कारण होते, त्याप्रमाणेच कोणत्या गोष्टींना प्रमाण मानावयाचे हेही एक कारण दडलेले होते. त्याचा परिणाम म्हणून वेद मानणारे आणि वेद न मानणारे अशी स्थिती उत्पन्न झाली. या आर्येतर जमातींना आर्यांनी असूर, दस्यू, राक्षस आणि लोक या नावांनी संबोधले. म्हणून वेदबाह्य वाङ्मय ते लोकवाङ्मय, वेदबाह्य संस्कृती म्हणजे लोकसंस्कृती अशी धारणा प्रारंभी निर्माण झाली. कोणत्याही संस्कृतीचा मूलाधार लोक म्हणजे जनता हाच असतो हे खरे; पण ही जनता आर्येतर जमातींची होती, हे विसरून चालणार नाही." (लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, पृ. १२.) त्यांचे हे म्हणणे वस्तुस्थितीच्या अधिक जवळ जाणारे आहे, हे विसरता येणार नाही.

संस्कृती ही संकल्पना अतिशय गुंतागुंतीची आहे. डॉ.द.ता.भोसले यांच्या मते– "संस्कृती ही बाब इतकी बहुआयामी व गुंतागुंतीची आहे, की तिची काटेकोर व सर्वसमावेशक व्याख्या करणे कोणालाही शक्य होणार नाही. संस्कृतीच्या व्याख्यांत विविधता आढळते ती यामुळेच. या व्याख्याही पुन्हा विवरणात्मक स्वरूपाच्याच देता येतात. माणूस हा भोवतालच्या निसर्गामध्ये जीवनाच्या प्रगतीला अनुकूल असे बदल करून म्हणजे त्यावर संस्कार करून आपले जीवन अधिक सुरक्षित, अधिक सुखमय आणि अधिक समृद्ध बनवितो. त्याबरोबरच तो स्वतःचे मन, बुद्धी, कल्पकता यांचा अधिक चांगला वापर करतो. या साऱ्यांना स्थूलपणे संस्कृती म्हणता येईल. म्हणून धर्मासह समग्र अंतर्बाह्य जीवनाच्या उन्नत अवस्थेचे परंपरेने वाढत जाणारे प्रतीक म्हणजे संस्कृती होय. म्हणजे संस्कृतीत भौतिक सृष्टीतील परिवर्तन व त्याचबरोबर मानसिक परिवर्तन हातात हात घालून येत असते." ( लोकजीवन आणि लोकसंस्कृती, पृ.६३.) अर्थात या विवेचनातून लोकसंस्कृतीच्या गुंतागुंतीच्या स्वरूपावर प्रकाश पडतो. तिच्या जडणघडणीचा प्रवास अधोरेखित होतो. सोयीसाठीची एक व्याख्याही आपणास मिळते 'संस्कृतीच्या पाऊलखुणा' या पुस्तकाच्या मनोगतात ते लिहितात. "(आर्य आणि आर्येतरांतील ) संघर्षाप्रमाणेच समन्वयाच्या आधारे दोन वंशांमध्ये, दोन संस्कृतींमध्ये निर्माण झालेले जे मिश्रण, त्यातून लोकसंस्कृती तयार झालेली आहे. या आदान-प्रदानाला द्रवीडांनी फार मोठा हातभार लावला. ते दक्षिणेतून मध्यभारत व वायव्येकडेही पसरले. येथल्या अनेक मूळ जाती-जमाती भारतभर पसरलेल्या आहेत. या प्रत्येक जातीची भाषा, दैवत, परंपरा, आणि श्रद्धाविषय स्वतंत्र होते. त्यामुळे इथे नानाविध रीतीरिवाज व जाती-उपजाती पाहावयास मिळतात. या सगळ्यांचे एकात्म स्वरूपात तयार झालेले रसायन म्हणजे आजची आपली लोकसंस्कृती होय."

अर्थात पृथ्वीच्या पाठीवरील कुठलाही-कोणत्याही काळातला समूह असो, त्या समूहाची त्या टप्प्यावरच्या










ज्ञान-अज्ञानाची, श्रद्धा-अंधश्रद्धांसहची, विकार-विकृतींसहची, भौगोलिक पर्यावरणाच्या परिणामासहची, नैतिक आणि अनैतिक, मूल्यात्मक आणि भौतिक स्वरूपाची जी पारंपरिक जीवनव्यवस्था असते, ती त्यांची संस्कृतीच असते. आदिम जीवनाशी नाते असणारी म्हणून ती आदिम संस्कृती ठरते. आदिमांशी नाते सांगणाऱ्या मूळ निवासी लोकांची–आदिवासींची–जीवनपद्धती म्हणून तिला आदिवासींची संस्कृती म्हणता येते. ग्रामीण माणसांच्या जगण्याचा भाग झालेली म्हणून तिला ग्रामीण संस्कृती म्हणता येते, लोकांनी निर्माण केलेली–लोकजीवनाचा भाग झालेली–आणि लोकांना आपलीशी वाटणारी म्हणून ती लोकसंस्कृती असते. काळाच्या ओघात नव्या संस्कृतीशी परिचय-संघर्ष-समन्वय अशा प्रक्रियेतून आकाराला आलेल्या व लोकजीवनात प्रचलित झालेल्या नव्या मिश्र व्यवस्थेसही आपण लोकसंस्कृती म्हणून ओळखत असतो. आजची आपली लोकसंस्कृती अशीच मिश्र स्वरूपाची आहे. डॉ.द.ता.भोसले यांनी या संमिश्र स्वरूपाच्या लोकसंस्कृतीची सविस्तर चर्चा त्यांच्या लेखनातून केली आहे.

**लोकसंस्कृतीच्या रंगरूपाची अक्षरनोंद**

डॉ.द.ता.भोसले यांनी संस्कृतीच्या पाऊलखुणा, चावडीवरचा दिवा, लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, लोकजीवन आणि लोकसंस्कृती (संपादन), लोकसंस्कृती : बंध–अनुबंध या पुस्तकांतून महाराष्ट्रातील लोक-संस्कृतीच्या रंगरूपाची अक्षरनोंद केली आहे. आवश्यक तेथे भारतीय आणि जागतिक लोकसंस्कृतीचेही संदर्भ नोंदवले आहेत. 'ग्रामीण बोलीचा शब्दकोश' या शब्दकोशातूनही भाषिक रूपामागील लोकसंस्कृती अक्षरबद्ध झाली आहे. 'परिघावरची माणसं' मधील लेखनातूनही डॉ.द.ता.भोसले यांच्या जीवनाचा पूर्वकाळ तत्कालीन सर्व संदर्भासह येतो. लेखकासोबतच तत्कालीन इतर लोकांचे लौकिक जीवन त्यात येते. हे लोकजीवन भौगोलिक पर्यावरण आणि लोकसंस्कृतीसह येते. एवढेच काय, 'पाठराखण' मधील समीक्षणात्मक लेखनातूनही लोकसंस्कृतीचे चित्रण आणि विश्लेषण येतेच. लेखकाच्या भौतिक जगण्याला नि संवेदनाशील मनाला आकार देणारी व ते जगणे समृद्ध आणि संपन्न करणारी लोकसंस्कृती त्यांच्या शब्दाशब्दांमधून आविष्कृत होते. अभिव्यक्ती कुठल्याही आकृतिबंधातली असो, तिचे स्वरूप ललित असो, समीक्षणात्मक असो, वैचारिक असो की अन्य स्वरूपातील असो; त्यात लोकसंस्कृतीचे संदर्भ येतातच.

'ग्रामीण बोलीचा शब्दकोश' मध्ये मराठीच्या ग्रामीण बोलीतील तीनशे शब्द त्यांच्या सविस्तर अर्थांसह नोंदवले आहेत. बऱ्याच शब्दांचे अर्थ सचित्र दिले आहेत. या प्रत्येक शब्दाच्या अर्थापाठीमागे लोकसंस्कृतीचा संदर्भ असून तो संदर्भ लेखकाने मुळातून अत्यंत ठळकपणे आणि आस्थेने नोंदवला आहे. फुकणी-फुंकणी, डालगे, गरवार, छाटन/ण, चिरडी, येरवाळी, तांबले, धपाटे, बाटका, वाम्बाळ सोयरा, निवद-बोणं, पैरण, कुंची, वैल, चिलीम, चिरगूट, दिवळी, चंची, पुळका, बेवडा, बुळा, नहाण/न्हाण, मुराळी, म्होतूर, शिंदळी, सणंग, अशा या शब्दांचा अर्थ सांगताना या शब्दांच्या अर्थापाठीमागे लोकजीवनाचे, त्यांच्या भाव-भावनांचे, पवित्र-अपवित्र कल्पनांचे, ज्ञान-अज्ञानांचे, श्रद्धेचे-अंधश्रद्धेचे, कृतज्ञतेचे आणि कृतघ्नपणाचेही संदर्भ नोंदवले आहेत. अशा शब्दांचे अर्थ सांगताना त्या अर्थाशी संबंधित लोकसंस्कृतीचे संदर्भ आलेले आहेत. आणि म्हणून हा केवळ शब्दकोश न राहता लोकसंस्कृतीच्या रंगरूपाच्या नोंदीचा महत्त्वाचा संदर्भग्रंथ झाला आहे. डॉ.द.ता.भोसले म्हणतात त्याप्रमाणे "शब्द हा काही केवळ संकेत घेऊन येत नाही; त्याचबरोबर तो संस्कृती घेऊन येत असतो. प्रवाही समाजजीवनही घेऊन येत असतो. कोणत्याही संस्कृतीचे सार, सामर्थ्य आणि समृद्धी या शब्दांमध्येच सामावलेली असते." (ग्रामीण बोलीचा शब्दकोश, मनोगत.) याचा प्रत्यय 'ग्रामीण बोलीचा शब्दकोश' मधून येतो.

'लोकसंस्कृती : बंध-अनुबंध' या पुस्तकात लोकसंस्कृतीच्या विश्लेषणाबरोबरच लोकजीवनातील लोप पावलेले विवाहविधी, रामायण 'बसले' आहे, चूल : ग्रामसंस्कृतीची ऊर्जादेवता, चिलीम : लोकमानसाचा विसावा या लेखांतून महाराष्ट्रातील ग्रामसंस्कृती शब्दबद्ध झाली आहे. ग्रामीण लोकमानस आणि त्या लोकमानसातून आकाराला आलेली पोथी लावण्याची परंपरा तपशिलांसह शब्दरूप घेते. मानवी जीवनातील अनेक विधींपैकी अत्यंत

महत्त्वाचा ठरलेल्या विवाहविधीचे लेखकाने केलेले चित्रण अत्यंत महत्त्वाचे ठरते. विवाहविधीतील बोहले, सुपारी सोडणे हे शब्दही आता ऐकायला मिळत नाहीत. विवाहविधीचे स्वरूप आता खूप बदलले आहे. लेखकाने लोकसंस्कृतीतील हा विवाहविधी शब्दबद्ध केला आहे. ग्रामसंस्कृतीची ऊर्जादेवता ठरलेल्या चुलीविषयी लेखकाने मोठ्या आस्थेने नोंदवले आहे.-"चूल म्हणजे अग्नीचं संरक्षक आणि सुभग रूप. हा अग्नी आदिम समाजापासून आधुनिक समाजापर्यंत सर्वांना साथ आणि सोबत करीत आला आहे. तो मानवाला प्रकाश देतो, ऊब देतो; नव्हे, त्याला जीवनच बहाल करतो. तोच माणसाच्या मुखात रुचकर घास भरवितो. इवल्याश्या तृणपात्यापासून विशाल वटवृक्षापर्यंत सर्वांना जीवनरस पुरवितो. अशा या अग्नीनेच मानवी जीवनात क्रांती केली. मानवी जीवन उन्नत केले. तो नानारूपांनी मानवाला उजळवून टाकत असतो. तोच भूमीमध्ये अन्न निर्माण करतो. निर्माण केलेले अन्न वाढवितो, दीर्घकाळ टिकवितो. त्याचे रुचकर अन्नात रूपांतर करतो नि बाळमुखापासून तो दंतहीन मुखापर्यंत सर्वांना भरवून तृप्त करतो. तुमच्या-माझ्या या देशात शाश्वत चैतन्याच्या रूपाने तोच वावरत असतो. तो आहे म्हणून दृष्टी आहे. तो आहे म्हणून सृष्टी आहे. आणि तो आहे म्हणून समष्टी नांदते आहे. या चराचर सृष्टीला आधारभूत असलेल्या सर्वव्यापी अग्नीचे शुभम् रूप म्हणजे हा चुलीतील अग्नी. हे सगळे श्रेयस अग्निरूप या खेडूत बायकांच्या मनी-मानसी परंपरेने खोलवर रुजलेले असते. त्यांच्या रक्तातून झंकारत असते आणि श्वासात सामावलेले असते. म्हणूनच त्यांचे सश्रद्ध हात या अग्निदेवतेपुढे जोडले जात असावेत. म्हणूनच खेड्यातील प्रत्येक स्त्री भाकरी करण्यापूर्वी रुपयाच्या आकाराचा एक छोटासा दामटा आधी तव्यावर भाजून घेते आणि थोडासा ओला करून या अग्निदेवतेला नैवेद्य म्हणून अर्पण करते. ग्रामसंस्कृती कृतज्ञतेवर पोसलेली असते, याचे हे मोठे मनोज्ञ रूप म्हणावे लागेल!" (लोकसंस्कृती : बंध-अनुबंध, पृ. १२५-१२६.) हे मनोज्ञ रूप मानवी मनाला भावणारे असेच आहे.

'लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष' मध्ये लोकदैवते, लोकमानसाने पूजनीय ठरवलेले निसर्गातील अनेक घटक आणि लोकांचे निसर्गसन्मुख जगणे आले आहे. भूमीविषयीची लोकधारणा, नागपूजा, वृक्षपूजा, पाषाणपूजा, पंढरीची दिंडी, होळीसारखा सण इत्यादींतून महाराष्ट्रातील खेड्याखेड्यांतून जगणारा माणूस त्यांच्या श्रद्धा-अंधश्रद्धा, भाव-भावना, इच्छा-आकांक्षांसह शब्दरूप घेतो. त्यांच्या सुख-दुःखांसह, जीवनप्रेरणांसह येतो. त्यांच्या जगण्या-भोगण्यासह येतो. बोलण्या-वागण्यासह येतो. त्यांच्या सभोवतालच्या प्राणी आणि निसर्गसृष्टीसह येतो. त्यांच्या जगण्याला असणाऱ्या कालच्या आणि आजच्या संदर्भासह येतो. लोकसंस्कृतीची जडणघडण येते. तिचे प्रगल्भ रूप-स्वरूप येते. तिचा विकृतीकडचा प्रवासही शब्दरूप घेतो.

'संस्कृतीच्या पाऊलखुणा' मध्ये लोकजीवनातील अनेक सणोत्सवांचे चित्रण येते. दीपावली, हादगा आणि भुलाई, वेळ अमावस्या, नव्याची पुनव अशा सणांबरोबरच बहुरूपी, पोतराज, आराधी या लोकसंस्कृतीच्या उपासकांचे चित्रण येते. जोगती-जोगतीण आणि जोगवा, यज्ञोपवीत, चिंध्यादेवीची उपासना, अंगात येण्याचा प्रकार, जाते आणि मडके, बगाड, वीरगळ, लोकसंस्कृतीने टाकून दिलेली वस्त्रे, नवस, पागोटे आणि पगडी, दृष्टबाधा, सूप, बोहाडा, अलंकार आणि संस्कृती, नागपूजा, लोकजीवनातील कावळा, स्वर्गवासी झालेले पदार्थ, जलदेवतेची पूजा, गुग्गुळविधी, साती आसरा, ओटीभरण, गोंदण, मुराळी, मंगळसूत्र अशा लेखांतून लोकसंस्कृतीचे वैविध्यपूर्ण वास्तवरूप अधोरेखित होते. 'लोकसंस्कृतीने टाकून दिलेली वस्त्रे' या लेखात लेखकाने पुढील वस्त्रपरंपरेची नोंद केली आहे. बाराबंदी, उपरणे, धोतर, चोळणा, रुमाल, मुंडासे, अंगरखा, कोपरी, बंडी, छाटण, लुगडे, नऊवारी साडी, पैठणी, इरकली, नागपुरी, चोळी, परकर, पोलके, चिरडी, सुरके, झबले, टकुचे, कुंची, चंची गोधडी, लेपाट, कांबळी, जीन पासोडी इत्यादी. या वस्त्रांची वैशिष्टे नोंदवली आहेत. त्यांचे उपयोग नोंदवले आहेत. या वस्त्रपरंपरेमागील लोकधारणा नोंदवल्या आहेत. अर्थात या सगळ्यातून हे सहज लक्षात येते, की लेखकाने अतिशय सूक्ष्म तपशिलांसह लोकजीवनातील छोट्या-मोठ्या घटकांची आस्थेने नोंद केली आहे. 'स्वर्गवासी झालेले पदार्थ' या लेखात लोकांना










जगवणाऱ्या, लोकांच्या जिभेला चव आणणाऱ्या, लोकजीवनात प्रतिष्ठित झालेल्या नि लोकांच्या पोटाची भूक भागवणाऱ्या सगळ्या पदार्थांची परंपराच शब्दरूप घेते. 'पखाल' मध्ये समूहभाव आणि सहानुभावासह जगणाऱ्या ग्रामीण माणसांचे, त्यांच्या जीवनव्यवस्थेचे अंतरंग शब्दरूप घेते.

**लोकसंस्कृतीच्या भल्याबुऱ्या रंगरूपाची चिकित्सा**

डॉ.द.ता.भोसले यांनी लोकसंस्कृतीच्या रंगरूपाची नोंद केली त्याचबरोबर त्यांनी त्या लोकसंस्कृतीच्या भल्याबुऱ्या रूपाची वस्तुनिष्ठ चिकित्साही केली आहे.

संस्कृती! मग ती माणसांच्या जीवनप्रवासाचा एक भाग होऊन आकाराला आलेली असो, की विशिष्ट समूह-जात-पंथादी घटकांनी लादलेली असो, तीत चांगल्याबरोबर वाईट आणि वाइटाबरोबर चांगलेही असतेच. फारतर प्रमाणाची तुलना करता येईल. आणि म्हणून वैदिक संस्कृतीपेक्षा लोकसंस्कृती अधिक समृद्ध, बहुजनांच्या जीवनाचे संदर्भ असणारी, त्यांच्या हिताचा विचार करणारी, तुलनेने बहुसंख्य लोकांना आपली वाटणारी नि बहुसंख्य लोकांचा सन्मान राखणारी आहे, असे म्हणता येईल. पण म्हणून ती पूर्णतः निर्दोष ठरवता येणार नाही. लोकसंस्कृतीतही ज्ञानाबरोबरच अज्ञान आहे. अंधश्रद्धा आहे. माणुसकीबरोबर अमानुषता आहे, कृतज्ञतेबरोबर कृतघ्नताही आहे, नीतीबरोबर अनीतीही आहे. भूमात्रावरील दयेचे समर्थन करणाऱ्या या लोकसंस्कृतीत प्राण्यांचा बळी देण्याची क्रूर प्रथाही आहे, हे कसे नाकारता येईल? डॉ. द. ता. भोसले यांनी लोकसंस्कृतीच्या या भल्याबुऱ्या रूपाची वस्तुनिष्ठ चिकित्सा केली आहे.

डॉ. द. ता. भोसले यांची लोकसंस्कृतीकडे पाहण्याची दृष्टी आपलेपणाची आहे. त्यांनी लोकसंस्कृतीतील विविध सण, दैवते, पूजाविधी, यात्रा, परंपरा, रितीभाती, संकेत, भूत-पिशाच्च यांविषयीच्या लोकधारणा; शुभ-अशुभाच्या, पाप-पुण्याच्या कल्पना; त्यातून आकाराला आलेली नीतिव्यवस्था, कुटुंबसंस्था, नातेबंध, विविध कला; लोकसंस्कृतीचे उपासक-कलावंत यांचे समाज-व्यवस्थेतील स्थान; बलुतेदारी पद्धती-त्यातून आकाराला आलेला समूहभाव आणि सहानुभाव, गावगाडा पद्धती; माणूस, निसर्ग आणि प्राणिसृष्टीसहचे परस्परावलंबी जगणे इत्यादी घटकांचे आपुलकीने चित्रण केले आहे. या सगळ्या घटकांचा एक भाग होऊन जगणाऱ्या डॉ.द.ता.भोसले यांच्या मनात या सगळ्या घटकांविषयी आत्मीयता आहेच. या सर्व घटकांच्या असण्यानेच लोकजीवन अर्थपूर्ण होते, ही त्यांची भूमिका असून ही भूमिका त्यांनी निःसंदिग्धपणे नोंदवली आहे. ग्रामीण भाषेतील अनेक शब्द लोप पावताहेत, त्या शब्दांच्या, अर्थापाठीमागे असलेले सांस्कृतिक संदर्भ काळाच्या पडद्याआड जाताहेत, त्याविषयी त्यांना रुखरुख वाटते. 'ग्रामीण बोलीचा शब्दकोश' या पुस्तकातील मनोगतात त्यांनी लिहिले आहे की, "हे लोप पावलेले आणि लोप पावत चाललेले शब्द म्हणजे लोप पावत चाललेली आपली संस्कृतीच होय. कारण शब्द हा काही केवळ संकेत घेऊन येत नाही; त्याबरोबरच तो संस्कृती घेऊन येत असतो. प्रवाही समाजजीवनही घेऊन येत असतो. कोणत्याही संस्कृतीचे सार, सामर्थ्य, आणि समृद्धी या शब्दांमध्येच सामावलेली असते. या शब्दांतूनच आपणाला आपली संस्कृती समजत असते. तिची ओळख होत असते. म्हणून लोकजीवन आणि लोकसंस्कृतीचे निदर्शक असलेले हे ग्रामीण बोलीतील शब्द आपण जतन केले पाहिजेत."

ग्रामीण माणसांचे निसर्गसन्मुख पारंपरिक जगणे व त्यांच्यातील श्रमविभागणीच्या पायावर उभ्या असलेल्या सामूहिक जीवनपद्धतीविषयी ते लिहितात- "कासार, गवंडी, परीट, न्हावी, कोळी, कुंभार, माळी, पाथरवट अन् शिंपी इत्यादी हे सारे सेवेकरी ग्रामसंस्कृतीची मनोभावे सेवा करीत असतात. या ग्रामीण समाजाचे जगणे सुसह्य करीत असतात. त्यांचे श्रम वाटून घेतात. नाहीतरी संस्कृती म्हणजे तरी काय? जगणे सुसह्य करणाऱ्या नानाविध सुविधांची रेलचेल म्हणजे संस्कृती! आहार-विहार, सण-सोहळे, शोध, सोयी, सौंदर्यवर्धक साधने नि मनाचे भरण-पोषण करणारे तत्त्वज्ञान, देवदेवता व उपासनापद्धती यांसारख्या हरएक गोष्टींनी संस्कृती समृद्ध होत असते." (संस्कृतीच्या पाऊलखुणा, पृ. १२२-१२३.) सेवा, सोय आणि श्रमविभागणीच्या हेतूने निर्माण झालेली आणि ग्रामीण समाजात कित्येक वर्षे टिकून राहिलेली 'पखाल'

कालबाह्य होणे ही बाब लेखकाला हुरहुर लावून जाते. ते लिहितात - "खेड्याला जीवन देणारा व त्यातून स्वतःचे जीवन सावरणारा हा पखालवाला माणूस निसर्ग, समाज यांच्यातला एक प्रसन्न दुवा बनलेला होता. संस्कृतीची पूर्णतः बुझून गेलेली ही पाऊलखुण अजूनही हुरहुर निर्माण करते, यात शंका नाही." (संस्कृतीच्या पाऊलखुणा, पृ. १२५.) त्यांच्या दृष्टीने इतरही अनेक गोष्टींचे कालबाह्य होणे हुरहुर लावणारे ठरते. सणोत्सवांचे गतकालीन उत्साही स्वरूप, यात्रा-जत्रांतला जोष, स्त्री वा पुरुषांनी अंगावर अनेक अलंकार घालणे, अंगावर घालावयाची विविध वस्त्रे, जिभेची चव सांभाळणारे विविध पदार्थ, एकत्र कुटुंबपद्धती, नातेबंध, निसर्गातील अनेक सजीव-निर्जीव घटकांची पूजा करण्याची परंपरा व पद्धती, घरातल्या चुलीचे वा पाळण्याचे उपयोग आणि त्यांचे सांस्कृतिक महत्त्व अशा कितीतरी घटकांचे कालचे असणे लोप पावत जाणे, त्यांना योग्य वाटत नाही.

बहुरूप्यांसारख्या लोकसंस्कृतीच्या उपासकाचे समाजव्यवस्थेतले स्थान व समाजजीवन अधिक समृद्ध करण्यातील त्यांच्या योगदानाविषयी ते लिहितात- "ग्रामसंस्कृतीतल्या लोकजीवनाचा थोडासा बारकाईने विचार केला, तर असे दिसून येईल, की या जीवनाला कष्ट, चिंता आणि असुरक्षितता यांचा उपजतच शाप आहे. हे लोकजीवन नियतीच्या काटेरी चाकाने रक्तबंबाळ होत असते. दुष्काळ, महापूर, रोगाची साथ, उपासमार यांनी चिंताक्रांत बनलेले असते. धार्मिक कर्मकांडांच्या विळख्यात सापडलेले असते. नियतीच्या अदृश्य शक्तीपुढे पदोपदी हतबल होत असते आणि शेतातल्या कष्टांमुळे पार आंबून गेलेले असते.....

"बहुरूप्याच्या या सोंगामुळे आणि प्रत्ययकारी नकलांमुळे लोकमानसाची निखळ करमणूक होते हा भाग आहेच; विनोदामुळे त्यांचा श्वास मोकळा होतो हे खरेच; पण त्याचबरोबर तो नकळत लोकजीवनाचे प्रबोधनही करीत असतो. ग्रामीण समाजातल्या विकृतींवर बोट ठेवतो. समाजातले विविध स्तर कसे वागतात, बोलतात, फसवतात याचे दर्शन घडवितो. मानवी स्वभावाचे त्यातूनही दर्शन घडवीत असतो. म्हणून हा बहुरूपी एका परीने समाजजीवनाचा भाष्यकार या नात्याने भूमिका बजावत असतो."(संस्कृतीच्या पाऊलखुणा, पृ.३६-३७.)

अर्थात डॉ.द.ता.भोसले यांनी त्यांच्या लेखनातून लोकसंस्कृतीच्या रंगरूपाची अत्यंत श्रद्धाभावाने नोंद केली आहे. लोकसंस्कृतीने लोकजीवन समृद्ध केल्याचे नोंदवले आहे. त्यांनी अत्यंत स्पष्टपणे लिहिले आहे, की "या संस्कृतीच्या गाभ्यात असलेला तत्त्वविचार, मूल्यविचार, नीतिविचार आजही कालबाह्य ठरलेला नाही. व्यक्ती, समाज आणि निसर्ग यांची परस्परांशी असलेली सांगड या संस्कृतीने घातली व सर्वांच्या सर्वांगीण अभ्युदयाचा, परस्परांच्या सहजीवनाचा या संस्कृतीने आदर्श घालून दिला आहे. त्यातूनच मानवी जीवनाला इथे कधी रितेपण आले नाही. एकलेपणाने घेरलेले दिसत नाही. आसक्ती आणि विरक्ती, त्याग आणि भोग, विवेक आणि विकार, शरीर आणि आत्मा, श्रेष्ठ नि क्षुद्र, प्रपंच आणि परमार्थ यांचा आपल्या संस्कृतीने जो सुयोग्य मेळ घातलेला आहे आणि त्याद्वारे जीवनाचा जो निकोप आदर्श उभा केलेला आहे, त्याचे जतन होणे आजही नि उद्याही तितकेच गरजेचे ठरणार आहे." (लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, पृ. १६८.)

मात्र असे असले, तरीही त्यांनी लोकसंस्कृतीतील अतार्किक-कालबाह्य आणि निरर्थक बाबींचे समर्थन केले नाही. डॉ.द.ता.भोसले यांनी मनुष्यविघातक रूढी-प्रथा-परंपरांवर, अज्ञानाधारित मानसिकतेवर, अंधश्रद्धांवर प्रहार केले आहेत. संस्कृतीच्या निर्मितीत मानवी जीवनप्रवासाची स्थिती-गती, काळ, त्या त्या प्रदेशाची भौगोलिक रचना आणि नैसर्गिक पर्यावरण इ.घटक महत्त्वाचे ठरतात, तर तिच्या प्रवासातही हे घटक महत्त्वाचे ठरले पाहिजेत, बदलत्या काळाप्रमाणे आणि सभोवतालच्या परिस्थितीप्रमाणे संस्कृतीनेही बदलले पाहिजे, ही भूमिका मांडली आहे. त्यांनी असे नोंदवले आहे, की "परिवर्तन हे कोणत्याही संस्कृतीच्या जिवंतपणाचे एक महत्त्वाचे लक्षण असते. जी संस्कृती समाजजीवनाच्या बदलांबरोबरच बदलत असते, ती केवळ जिवंत राहत नाही; ती अधिक समृद्ध बनते. अधिक प्रवाही बनते, आणि तितकीच लवचीकही होते. समाजाची गरज, शेजारच्या संस्कृतीचा स्वत्व न गमावता केलेला स्वीकार, नव्या वस्तुनिदर्शक








शब्दांची निर्मिती, संस्कृती संपन्न करणारी ग्रंथनिर्मिती आणि प्रसंगपरत्वे घेतलेला राजाश्रय यांमधून कोणतीही संस्कृती प्रवाही होत असते आणि तेवढीच ती सक्षमसुद्धा बनत असते. ज्या संस्कृतीच्या घटकांमुळे समाजात श्रमाची बचत होते, समाजाचे संरक्षण होते, समाजाची चांगली सोय होते आणि समाजाला आवश्यक असा 'मानसिक' आधार मिळतो, ती संस्कृती नामशेष होत नाही. परकीय आक्रमणातसुद्धा ती टिकून राहते; फक्त तिचा विस्तार होत नसतो. उपयुक्तता, प्रवाहीपणा आणि सर्वसमावेशकता या गुणांमुळेच भारतीय संस्कृती आजही टिकून आहे." (लोकसंस्कृती : बंध - अनुबंध, पृ. ६१.) अर्थात अपेक्षित नव्या बदलांचे त्यांनी समर्थन केले आहे. काळाप्रमाणे संस्कृतीने बदललेच पाहिजे, ही भूमिका मांडली आहे. अर्थात डॉ.द.ता.भोसले हे केवळ परंपरावादी नाहीत, दैववादी नाहीत वा लोकसंस्कृतीच्या नावाखाली अज्ञान-अंधश्रद्धेचे ते समर्थन करत नाहीत. उलट, समाजहिताच्या संदर्भात ते लोकसंस्कृतीचे विश्लेषण करतात. "ग्रामदेवतांची पूजा किंवा उपासना भक्तीतून निर्माण झालेली नसून भीतीतून निर्माण झालेली आहे," (लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, पृ.१८), ही वस्तुस्थिती त्यांनी स्पष्टपणे नोंदवली आहे.

डॉ.द.ता.भोसले यांनी लोकसंस्कृतीमध्ये रुजलेल्या आणि टिकून असलेल्या शुभ-अशुभाच्या धारणा, निसर्गातल्या गूढ शक्तीचे भय, देवदेवतांची कृपा वा अवकृपा, भुताखेतांची वाटणारी भीती अशा कल्पनांच्या पाठीमागे शास्त्रशुद्ध माहितीचा अभाव, निखळ ज्ञानाची वानवा अन् परंपरेने चालत आलेल्या श्रद्धा-धारणांवर अढळ विश्वास ही कारणे असल्याचे नोंदवले आहे, (संस्कृतीच्या पाऊलखुणा, पृ. २०१). लोकांनी अशा अज्ञानावर आधारलेल्या भ्रामक कल्पनांच्या प्रभावातून मुक्त होणे त्यांच्या हिताचे आहे, अशी भूमिका मांडली आहे. जबाबदार माणसांनी तर्क-विवेक-बुद्धिवादाचा आश्रय, शास्त्रीय ज्ञानाची जोड, शिक्षणाचा प्रसार व मनोनिर्धार या गोष्टींचा सातत्याने प्रसार करणे आवश्यक आहे. आणि सर्वांनीच आपल्या हितासाठी वैज्ञानिक दृष्टिकोन, विवेकवाद स्वीकारणे आवश्यक असल्याचेही त्यांनी नोंदवले आहे, (संस्कृतीच्या पाऊलखुणा, पृ. २०२).

डॉ.द.ता.भोसले यांनी अगदी स्पष्टपणे नोंदवले आहे, की "आपल्या संस्कृतीमध्ये साऱ्याच गोष्टी गौरवशाली आहेत म्हणून त्यांचे जतन केले पाहिजे, अशातली बाब नाही. आपल्या संस्कृतीमध्येही कालप्रवाहाबरोबर अनेक हीन नि निंद्य गोष्टी निर्माण झाल्या आहेत. त्यांचा आधार घेऊन अघोरी शोषण झाले आहे. माणसाला माणूस म्हणून मिळणारी वागणूक इथे विसरली गेली आहे. धार्मिक कर्मकांडाचा अतिरेक, त्यातून होणारे शोषण, वर्णाश्रमव्यवस्था, जातीयता, स्त्रियांना दिली जाणारी अमानुष वागणूक, त्यांच्यावर घातलेली बंधने, सामान्य माणसांच्या नशिबी आणली गेलेली गुलामगिरी, ज्ञान-साधना व धर्मकृत्यांविषयीचे काटेकोर नियम; पाप-पुण्याची स्वार्थी आणि भ्रामक कल्पना, स्पृश्यास्पृश्यभाव आणि या सर्वांमधून सामान्य माणसाची होणारी लूट, होणारी कुचंबणा, होणारी मानहानी यांसारख्या अनेक गोष्टी आपल्या संस्कृतीत निर्माण झाल्या आहेत. या साऱ्या गोष्टी त्याज्य आहेत. निंद्य आहेत. म्हणून आजही त्यांचे जतन करणे, त्यांचा अभिमानाने उल्लेख करणे सर्वथा गैर म्हटले पाहिजे." (पाठराखण, पृ.६७-६८.)

थोडक्यात सांगावयाचे म्हणजे लोकसंस्कृतीच्या मनुष्यजीवनाला समृद्ध करणाऱ्या चैतन्यशील रूपाचे, माणसाला माणूस म्हणून जगायला शिकवणाऱ्या आणि माणूस म्हणूनचे जगणे अधिक अर्थपूर्ण करणाऱ्या, प्राणिसृष्टी व निसर्गातल्या इतर सजीव-निर्जीव घटकांशी आपलेपणाने वागायला सांगणाऱ्या लोकसंस्कृतीच्या रूपाचे त्यांनी समर्थन केले आहे. नीतिव्यवस्थेची नि नातेबंधाची मांडणी करणाऱ्या, माणसाच्या अस्तित्वाला अर्थ प्राप्त करून देणाऱ्या आणि हे अस्तित्व निसर्गातल्या ज्या घटकांच्या अस्तित्वाशी जोडले आहे, त्या घटकांचे अस्तित्व जपणे हे आपले कर्तव्य आहे, याची जाणीव करून देणाऱ्या लोकसंस्कृतीतील मूल्यभावाचा त्यांनी गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. त्याचे त्यांनी समर्थन केले आहे. आपल्या पूर्वजांविषयी कृतज्ञतेचा भाव जपायला

शिकवणाऱ्या आणि पुढच्या पिढीच्या हितासाठी आपले कर्तव्य पार पाडायला सांगणाऱ्या प्रगल्भ लोकसंस्कृतीचे त्यांनी समर्थन केले आहे. मात्र त्याचबरोबर काळाबरोबर चालत आलेल्या नि अज्ञान-अंधश्रद्धेसह प्रवास करणाऱ्या लोकसंस्कृतीचे त्यांनी विश्लेषणही केले आहे. लोकसंस्कृतीतला हीणकसपणा वेळीच ओळखला पाहिजे, त्या हीणकसपणाचा त्याग केला पाहिजे, ही भूमिकाही मांडली आहे.

## या अक्षरनोंदीचे महत्त्व

डॉ.द.ता.भोसले यांनी संस्कृती म्हणजे काय? लोकसंस्कृती म्हणजे काय? आजच्या लोकसंस्कृतीचे स्वरूप कसे आहे? अशा विविध घटकांची चर्चा केली आहे.अनेक तपशील नोंदवले आहेत. त्याचबरोबर लोकसंस्कृतीच्या भल्याबुऱ्या स्वरूपाची चिकित्साही केली आहे. प्रश्न असाही निर्माण होतो, की डॉ.द.ता.भोसले यांच्या या कार्याचे महत्त्व काय? आणि कसे?

ज्या कोण्या माणसाला आपल्या स्वतःच्या जीवनाविषयी आस्था आहे, लोकांच्याविषयी आपलेपणा आहे, आपल्या मृत्यूनंतरही माणसांचे आणि त्यांच्या सभोवतालच्या घटकांचे अस्तित्व असावे, पुढच्या पिढीचे जगणे अधिक समृद्ध आणि विवेकाधिष्ठित असावे असे मनापासून वाटते, त्या माणसाकडून घडलेल्या निर्मितीचे कोणत्या ना कोणत्या स्वरूपाचे महत्त्व असतेच. डॉ.द.ता.भोसले यांच्या लेखनप्रेरणा स्पष्ट आहेत आणि त्या मनुष्यहिताशी जोडलेल्या आहेत.

डॉ.द.ता.भोसले यांनी विविध स्वरूपाचे लेखन केले आहे. त्यांचे लेखन वाचकप्रियही आहे. ते लेखन समीक्षक, अभ्यासक आणि विचारवंतांनी महत्त्वाचे मानले आहे.

पारंपरिक जीवनव्यवस्थेकडे म्हणजेच पर्यायाने लोकसंस्कृतीकडे पाहणाऱ्याचे प्रामुख्याने तीन गट दिसतात. काहीजण लोकसंस्कृतीचे श्रद्धेच्या-भावभक्तीच्या पातळीवर समर्थन करतात. अशा माणसांवर त्या भल्याबुऱ्या पारंपरिकतेचा प्रभाव असल्याने ती माणसे त्या प्रभावात जगतात. त्या पारंपरिक व्यवस्थेचा ती पुरस्कार करतात. इतरांचे भलेबुरेपण त्याच प्रभावात निश्चित करतात. समाजात आजही अशी अनेक माणसे पाहायला मिळतात. विज्ञानाची प्रगती आणि नवे संशोधन समजून न घेता अज्ञान-अंधश्रद्धांना, कालबाह्य प्रथा-परंपरांना चिकटून असणारी आणि स्वतःसह इतरांचाही अधःपात घडवून आणणारी माणसे कमी नाहीत. दुसरा एक वर्ग असा आहे, की त्यांना भूतकाळ निरर्थकच वाटतो. आपल्या पूर्वजांचा कित्येक वर्षांचा जीवनप्रवास, त्या जीवनप्रवासातले त्यांचे जीवनानुभव आणि त्या अनुभवांतून आकाराला आलेले जीवनज्ञान निरर्थक वाटते. नीतिव्यवस्था निरर्थक वाटते. भावसमृद्ध नातेबंधही नाकारण्याकडे यांचा कल असतो. ही माणसे संवेदनशील समृद्ध पूर्वपरंपरेवर टीका करत भावनाशून्य बुद्धिवादाचे समर्थन करत असतात. वस्तुतः या दोन्ही प्रवृत्ती चुकीच्या आणि हट्टाग्रही स्वरूपाच्या आहेत.

तिसरा दृष्टिकोन स्वीकारणाऱ्यांच्या मते जुने ते सगळेच सोने नसते; पण म्हणून जुने ते सगळेच टाकाऊ नसते, निरर्थक नसते, आणि नवे ते सर्वच टाकाऊ नसते तसेच ते सर्वच स्वीकारार्हही नसते. डॉ.द.ता.भोसले यांचीही अशीच वास्तवदर्शी भूमिका आहे. माणसांनी जुन्यातले आणि नव्यातलेही चांगले ते स्वीकारून आपले जीवन अधिक समृद्ध करावे, ही त्यांची भूमिका आहे. ही भूमिका स्वीकारून त्यांनी मांडलेले चिंतन आपणास पूर्वजांच्या जीवनव्यवस्थेतील चांगल्या-वाईटपणाचे दर्शन घडविते, त्याचबरोबर आधुनिकतेच्या नावाखाली आपण आपल्याच समृद्ध पूर्वपरंपरेपासून कसे दूर जात आहोत, विनाशाकडचा प्रवास करत आहोत, याचीही जाणीव करून देते.

पारंपरिक लोकसंस्कृती चांगली की वाईट? ती कोणासाठी चांगली आणि कोणासाठी वाईट? अशा प्रश्नांची सर्वमान्य उत्तरे असणार नाहीत. मात्र त्या लोकसंस्कृतीचे नेमके स्वरूप तरी समजून घेतले पाहिजे. आणि ते स्वरूप समजून घेण्यासाठी डॉ.द.ता.भोसले यांचे हे लेखन एक विश्वासार्ह माध्यम आहे, हे कसे नाकारता येईल?

लोकसंस्कृतीतील अज्ञान-अंधश्रद्धा आणि त्या अज्ञान-अंधश्रद्धेवर आधारलेल्या प्रथा-परंपरांचे समर्थन करता येणार नाही. मात्र त्या अज्ञान-अंधश्रद्धांवर आधारलेल्या प्रथा-परंपरेने, नवस-सायासाने, व्रताचरणाने, कर्मकांडादीने कधीकाळी लोकमनाला जगण्याचे बळ








दिले आहे. सुख-समाधान दिले आहे, हे नाकारता येणार नाही. नवस-सायास करणे, योगायोगाने चांगले घडणे–नवसामुळेच यश आले ही कल्पना-नवसाची पूर्ती–त्यातून मिळणारा आनंद–आपल्यापाठीमागे देवी-देवतांचा आशीर्वाद आहे. आपण एकटे नाही. आपल्यालाही न्याय मिळतो. आपल्या पुढच्या पिढीलाही तो मिळणार आहे, आपली मुले ईश्वरकृपेने कधीतरी सुखीसमाधानी होतील, ती श्रीमंत होतील हा आशावाद इ. गोष्टीही लक्षात घ्याव्याच लागतील. माणूस नावाचा प्राणी त्याच्या मूळ वृत्ती-प्रवृत्ती-प्रेरणांसह नीट समजून घेतला तर हे सहज लक्षात येते, की माणसे गोरगरिबांवर अन्याय-अत्याचार करत आलीत; करताहेत आणि करत राहतील. पूर्वी धर्मव्यवस्थेने समाजनियंत्रणाचे काम केले आहे. 'पंच', 'जातपंच' ही लोकसंस्कृतीतील न्यायव्यवस्थेचीच रूपे आहेत. मात्र तरीही गोरगरिबांवर अन्याय होतच राहिला. धर्मव्यवस्थेतील, त्या त्या काळातील सत्ताव्यवस्थेतील वा 'पंच', 'जातपंच' म्हणून काम करणारी माणसे किती माणुसकीची होती यावरून त्या त्या काळातल्या अन्यायाच्या तीव्रतेचे स्वरूप ठरत गेले. आजच्या भारतीय लोकशाहीत कायदे कितीही असले तरीही गोरगरिबांना न्याय मिळत नाही, या ना त्या प्रकारे त्यांच्या वाट्याला अन्याय-अपमान आणि अत्याचार येतो, ही वस्तुस्थिती नाकारण्यात अर्थ नाही. फारतर सत्तास्थानी कोण आहेत यावरून वेगवेगळ्या जात-धर्म-वर्गांवरील अन्यायाच्या तीव्रतेचे स्वरूप कमीजास्त होत असते. आणि मग माणसे जेव्हा माणसांवर अन्याय करतात तेव्हा माणसांनी देवाकडे न्याय मागणे, देवाने आपल्याला न्याय दिला, तोच गोरगरिबांचा वाली आहे असा श्रद्धाभाव जपणे व त्यातून जगण्यासाठीचे बळ मिळणे इत्यादी गोष्टी घडत असतात. या तर्कदृष्ट्या योग्य नाहीत हे कोणालाही कळते. सगळीच माणसे जेव्हा माणुसकीने वागतील, कोणी कोणावर अन्याय करणार नाही, माणसांवरील मनुष्यनिर्मित आणि नैसर्गिक संकटे कमी होतील, नवे संशोधन आणि त्या संशोधनाचे व यंत्रनिर्मितीचे फायदे सर्व माणसांपर्यंत जाऊन पोचतील, तेव्हा माणसे देवापेक्षा माणसांना अधिक मानतील. माणसे अज्ञान-अंधश्रद्धा जपणार नाहीत. पण वस्तुस्थिती वेगळी आहे. विज्ञानयुगात मानवी जगणे वैज्ञानिक सत्य आणि विवेकावरच अधिष्ठित असले पाहिजे, यात शंकाच नाही; मात्र काळ आणि परिस्थितीच्या पार्श्वभूमीवरील लोकमानसाची गुंतागुंतही नीट समजून घेतली पाहिजे. आणि ती गुंतागुंत समजून घेण्यासाठी डॉ.द.ता.भोसले यांचे लेखन अत्यंत महत्त्वाचे ठरते.

नवे वैज्ञानिक शोध माणसाला नवी दृष्टी देतात. मानवी जीवनाला उपकारक नव्या यंत्रांच्या निर्मितीमुळे मानवी जगणे अधिक सुखी होत असते. उखळात मसाला कुटत बसण्यापेक्षा मिक्सरमध्ये मसाला वाटणे सोयीचेच की ! यातून वेळ आणि श्रमाची बचत होते, हा फायदाच. इतरही अनेक वस्तूंच्या बाबत असाच विचार करता येईल. मात्र हे नवे काही हाताला लागत असतानाच आपण जुने काहीतरी गमावतही असतो. उखळात मसाला कुटून स्वतःच्या हाताने चुलीवर स्वयंपाक करून त्या भाजी-भाकरीच्या माध्यमातून जेवण करण्यापर्यंत आपल्या भावना आणि प्रेम पोचविण्याचे समाधान गमावले जाते, हे कसे नाकारता येईल? आपल्या लाडक्या लेकरासाठी वा नातवासाठी स्वतःच्या हाताने शिवलेल्या कुंची-टोपीपेक्षा मशीनवर शिवलेली कुंची-टोपी अधिक चांगली असणारच; मात्र त्या कुंची-टोपीत प्रेमाचा ओलावा कसा असेल? आज बाजारात मिळणारी प्लास्टिकची बाहुली कितीही सुंदर असली, तरी तिला पिढ्यान् पिढ्या घरात ठाण मांडून बसलेल्या पूर्वीच्या लाकडी बाहुलीची सर कशी येईल? पेट्रोल-डिझेलवर चालणारी कोणतीही गाडी कितीही सुंदर असली, तरीही स्वतःच्या हाताने चारापाणी करून वाढवलेले लाडके आणि विश्वासाचे बैल ज्या गाडीला जुंपले आहेत, त्या बैलगाडीतून प्रवास करण्यातील भावनिक गुंतवणूक वेगळीच की ! आजही कित्येक माणसे आपल्या पूर्वजीवनातील नातेबंधांच्या कथा, समूहभावाचे प्रसंग, प्राणी आणि माणसांतील प्रेमबंधाच्या-आपलेपणाच्या कथा, नीतिमूल्यांच्या कथा, सुगरण स्त्रियांच्या हातच्या स्वयंपाकाच्या कथा डोळ्यांत पाणी आणून सांगत असतात. त्यांचे ते इतर प्राणिसृष्टीसहचे निसर्गसन्मुख जगणे नीट लक्षात घेतल्यास त्यांच्या त्या जगण्यातील एक माणुसकीचा -प्रेमाचा-स्नेहाचा-आपलेपणाचा झुळझुळणारा झरा आपल्या लक्षात येईल. बदलत्या काळात त्या काळाला अनुसरून जगावे लागते, यात शंका नाही. पण कालचे








आपल्या पूर्वजांचे चांगल्या-वाइटासहचे भरभरून जगणे समजून घेण्यासाठी असे सांस्कृतिक जीवनाचे चित्रण करणारे लेखन महत्त्वाचे ठरत असते, हे कसे नाकारता येईल?

काळाच्या ओघात मौखिक परंपरेपेक्षा लिखित परंपरा अधिक महत्त्वाची ठरत गेली. मात्र तळागाळातल्या लोकांच्या-श्रमिकांच्या-कष्टकऱ्यांच्या भावसमृद्ध जीवनाकडे लिखित परंपरेने दुर्लक्ष केले. आपल्या पौराणिक साहित्यातून त्यांचे जगणे आले नाही, ही वस्तुस्थिती नाकारता येणार नाही. अलीकडच्या प्रस्थापित साहित्यिकांनीही आपल्या साहित्यात या जगण्याला महत्त्वाचे मानले नाही. परिणामी वाङ्मयाच्या इतिहासात आणि सांस्कृतिक मांडणीत हे जगणे दुर्लक्षित झाले. मात्र खऱ्या अर्थाने भारताचा सामाजिक-सांस्कृतिक इतिहास समजून घ्यायचा असेल, लिहायचा असेल, तर हे बहुजनांचे जगणे दुर्लक्षित करून चालणार नाही. तेव्हा त्या दृष्टीनेही डॉ.द.ता.भोसले यांनी तळागाळातल्या लोकांच्या-श्रमिकांच्या-कष्टकऱ्यांच्या भावसमृद्ध जगण्याची केलेली ही अक्षरनोंद अत्यंत महत्त्वाची ठरते.

प्रस्थापितांनी अभिजात ठरवलेल्या रामायण व महाभारताविषयी अनेक प्रश्न आहेत. त्या सर्व प्रश्नांची चर्चा येथे अपेक्षित नाही; मात्र जे कोणी या ग्रंथांचे दाखले देऊन आपला पूर्वकाळ सांगण्याचा प्रयत्न करतात, त्यांनी खालील प्रश्नांच्या संदर्भात विचार केला पाहिजे.

रामायणात वाल्मीकीने रामाचा गौरव केला. राजा दशरथांच्या बायकांचीही नोंद केली. मात्र स्वसंरक्षणासाठी धडपडणाऱ्या आणि स्वसंरक्षणाचे कौशल्य प्रयत्नाने आत्मसात करणाऱ्या शंबुकाच्या सामाजिक व्यवस्थेचे चित्रण केले नाही. रामाने शंबुकावर अन्याय केलाच; पण वाल्मीकीने त्याहीपेक्षा अधिकच अन्याय केला नाही का? निषादराज गुहाचा संदर्भ केवळ रामाची सोय करण्यासाठी येतो. सेवा करण्यासाठी येतो. भरताचे आतिथ्य करण्यासाठी येतो. शबरीचा उल्लेख येतो तोही तिने रामाची पाद्यपूजा करण्यासाठीच. नाना प्रकारच्या जंगली फळामुळांचा साठा रामाला देऊन टाकण्यासाठी. ब्राह्मणांच्या थोतांडी आशीर्वादाची कल्पना लोकमनात दृढ करण्यासाठी वाल्याकोळ्याची काल्पनिक कथा उभी केली जाते. पण शंबुक असेल, निषादराज गुह असेल, शबरी असेल वा वाल्याकोळी असेल; त्यांच्या सामाजिक सांस्कृतिक व्यवस्थेचे चित्रण का येत नाही. त्यांच्या वैभवसंपन्न व स्वाभिमानाने जगण्याचे, त्यांच्या पराक्रमाचे, त्यांनी आत्मसात केलेल्या विविध कौशल्यांचे, कर्तव्यकठोर मूल्यव्यवस्थेचे चित्रण का येत नाही?

महाभारतात कौरव-पांडवांचा व यादवकुळाचा लेखकनिष्ठ आलेख येतो. भीष्म, द्रोणाचार्यांच्या जीवन-प्रेरणांचा उलगडा होतो. कृष्ण, कर्ण, दुर्योधन, दुशासन, धर्म, भीम, अर्जुन, द्रौपदी, धृष्टद्युम्न, शिखंडी, जरासंध अशा काही मोजक्या पात्रांच्या जीवनसंघर्षाचे आणि जीवनप्रेरणांचे लेखकाला सोयीचे वाटणारे संदर्भ येतात. पत्नी पणाला लावण्याची आणि ती जिंकण्याची तत्कालीन प्रथा अधोरेखित होते. बहुपतित्वाची सामाजिक व्यवस्थाही लक्षात येते. नियोगाच्या पद्धतीवर प्रकाश पडतो. पण गुरूने अंगठा मागताच मागचा-पुढचा विचार न करता गुरूला दक्षिणा म्हणून अंगठा देणारा एकलव्य ज्या समूहाचा सदस्य आहे, त्याची सामाजिक-सांस्कृतिक जीवनव्यवस्था जाणीवपूर्वक अंधारात का ठेवली जाते? द्रोणाचार्यांच्या पोटभरू संस्कृतीपेक्षा त्यांच्या बाजूला नांदणाऱ्या आदिवासींची संस्कृती जास्त समृद्ध असण्याची शक्यता अधिक आहे. सातत्याने वाट्याला येणाऱ्या प्रतिकूल परिस्थितीशी दोन हात करण्यासाठी आणि स्वतःचे संरक्षण करण्याचे सामर्थ्य, युद्धकौशल्ये आणि आत्मबळ प्राप्त करण्यासाठीचा त्यांचा प्रयत्न का नोंदवला नाही? त्यांचे स्वाभिमानपूर्ण जगणे का शब्दबद्ध केले नाही? आपल्या बाजूला नांदणाऱ्या माणसांवर विश्वास ठेवणाऱ्या या भोळ्याभाबड्या माणसांचे भावविश्व, त्यांच्या जीवननिष्ठा न नोंदवता अशा भोळ्याभाबड्या माणसांच्या जीवननिष्ठांचा गैरफायदा घेणाऱ्या पोटभरू लाचार द्रोणाचार्यांचा इतिहास मांडला गेला. विशेष म्हणजे त्यांच्या त्या स्वार्थमूलक कुटील जीवनप्रेरणांचा गौरव केला गेला, हे सत्य कसे नाकारता येईल?

अर्थात आपल्या पौराणिक वाङ्मयाने नेमक्या लोकांचा, तोही लेखकाला गौरवाचा वाटला तेवढाच, भाग नोंदवला आहे. बाकी बहुजनांच्या जीवनाच्या इतिहासाची मांडणी केली नाही. कष्टकऱ्यांचे, श्रमिकांचे,








दीन-दलितांचे, त्यांच्या श्रद्धा-अंधश्रद्धांसहचे जीवन त्या वाङ्मयात आले नाही. काळाबरोबर बदल स्वीकारत टिकून राहिलेली लोकसंस्कृतीची ही समृद्ध जीवनधारा डॉ.द.ता.भोसले यांनी शब्दबद्ध केली आहे. त्यांच्या या लेखनाचे महत्त्व कसे नाकारता येईल?

'रामायण 'बसले' आहे!' या लेखात डॉ.द.ता.भोसले लिहितात- "(रामकथा ऐकल्याने) गावकऱ्यांच्या मनातील चोरी, फसवणूक, अनाचार, द्वेष, स्वार्थ, हिंसा, दंभ, आसक्ती यांसारख्या विकृतीस पायबंद बसतो. एवढेच नव्हे तर जीवनाकडे पाहण्याचा एक समंजस दृष्टिकोन या श्रवणातून तयार होतो." (लोकसंस्कृती : बंध - अनुबंध, पृ. १०७.) मात्र या म्हणण्यात फार काही सत्यता नाही. रामायण व इतर अशाच धार्मिक ग्रंथांच्या वाचन-श्रवणातून ग्रामीण माणसे बदलतात, याला काही पुरावा आढळत नाही. माणसे प्राप्त परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या मूळ प्रवृत्ती नि जीवनप्रेरणांसह जगत असतात, हेच खरे. माणसांच्या गेल्या कित्येक पिढ्यांना नियंत्रित करण्याचे काम धर्मव्यवस्थेने आणि अशा धार्मिक ग्रंथांतील मूल्यव्यवस्थेने केलेले आहे; पण म्हणून लोक धार्मिक ग्रंथांतील मूल्यव्यवस्थेचे पालन करत होते, असे म्हणता येणार नाही. सध्या समाजनियंत्रणाचे काम कायदे करताहेत. आणि अनेकजण कायद्याला न जुमानता आपापल्या पद्धतीने जगताहेत. गोरगरिबांवर अन्याय करताहेत. आपल्या चांगल्या-वाईट जीवनप्रेरणा पोसताहेत या वस्तुस्थितीचे आपण साक्षीदार-भागीदार आहोत. अर्थात पोथ्या वाचणारी-ऐकणारी माणसेही अशीच जगत आली आहेत. रामायणात श्रावणबाळाची कथा ऐकणारी माणसे आपल्या आईवडिलांची फारच सेवा करत होती, असे समजण्यात फार काही अर्थ नाही. उलट, मुलांनी आपल्या आईवडिलांची सेवा करावी, समाजाने म्हाताऱ्या माणसांची काळजी घ्यावी, हे जाणीवपूर्वक सांगण्याची वेळ त्याही काळात आली असण्याची आणि म्हणून हे सांगण्यासाठीच श्रावणबाळाची कथा रचली गेली असण्याची शक्यता अधिकची आहे. पुंडलिकाची कथाही तशीच. सामान्यतः रामायणकाळात वा पुंडलिकाच्या काळात सर्व मुलांनी आपल्या आईवडिलांची सेवा केली असती, तर या कथांना वेगळेपण लाभलेच नसते. या कथा टिकून राहिल्या नसत्या. डॉ.द.ता.भोसले म्हणतात, त्याप्रमाणे अशा पोथ्या ऐकून माणसे सुधारली असती, तर आकाशातल्या स्वर्गाच्या कथा कधीच विस्मरणात गेल्या असत्या. पृथ्वीवर स्वर्ग निर्माण झाला असता. 'पंढरीची दिंडी' विषयी लिहिताना ते म्हणतात, "दुःखाकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन बदलतो. मनाचा किरकिरेपणा कमी होतो; निरर्थक अपेक्षांचे तण मनामध्ये निर्माण होत नाही. एक उच्च कोटीचा शाश्वत आनंद आस्वादण्यास लाभतो. नीती आणि अनीती, श्रेष्ठ आणि क्षुद्र, भोगमय आणि त्यागमय, नित्य आणि अनित्य, सत् आणि असत् यांमधला विवेक ओळखण्याचे संस्कारी शिक्षण या दिंडी -पालखीबरोबरच्या प्रवासात मिळते." (लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, पृ. १०४.) मात्र वस्तुस्थिती अशी नाही. त्यांच्याच म्हणण्याप्रमाणे महाराष्ट्रातल्या चौतीस हजार खेड्यांतील सात लाख माणसे एवढी संस्कारित झाली असती तर आजचे महाराष्ट्राचे चित्र वेगळे राहिले असते. तेव्हा ऐकणारी तर सोडा पण पोथ्या वाचणारी, कीर्तन करणारी आणि वारीला जाणारी माणसे आणखी संस्कारित झाली नाहीत. इतरांसारखीच ती त्यांच्या माणूस म्हणूनच्या प्रेरणा-प्रवृत्तींसह जगत आली आणि जगताहेत, ही वस्तुस्थिती आहे. धर्माचरणाच्या सोंगाआडची पापाचरणाची परंपरा फार पुरातन आहे. संत नामदेवांच्या नावाने भजन करणाऱ्यांना आणि त्या भजनात डुलणाऱ्यांना संत नामदेवांचा "पोटासाठी जरी करी हरिकथा। जन रंजवितां फिरतसे।। १।। तेणें घात केला एकोत्तर-शतकुळांचा। पाहुणा यमाचा श्रेष्ठ थोर।। २।। द्रव्याचिये आशें हरिकथा करी। तया यमपुरी नित्य वास।। ३।। नामा म्हणे ऐसे होत जे रे कोणी। ते नर नयनीं पाहूं नये।। ४।।" (ना.गा. १७९८) हा अभंग माहीत नाही, असे नाही. आणि तरीही भजन-कीर्तन करणारे, टाळ-मृदंग वाजवणारे सर्वजण भजन-कीर्तन केल्याचा, टाळ -मृदंग वाजवल्याचा मोबदला म्हणून पैसे घेतात, ही वस्तुस्थिती असून मी त्याचा साक्षीदार आहे. विशेष म्हणजे ह्या बाबी अपवादात्मक नाहीत, त्या सार्वत्रिक आहेत.

सांगायचे ते हे, की गावागावांतून अशा पोथ्या

वाचण्याची प्रथा होती आणि आहे. आणि तरीही अशा गावातली माणसे जेव्हा त्यांचा भूतकाळ सांगतात, तेव्हा त्या काळात आणि आजही त्या गावातल्या गावकऱ्यांच्या मनातील चोरी, फसवणूक, अनाचार, द्वेष, स्वार्थ, हिंसा, दंभ, आसक्ती यांसारख्या विकृतींस पायबंद बसला नसल्याचेच वास्तव सांगतात. रामराज्याची कल्पना वास्तव नसून ते समाजमनाने कित्येक वर्षांपासून जपलेले स्वप्न असण्याची शक्यता अधिक आहे.

मात्र येथे आपल्या दृष्टीने महत्त्वाचे ते हे आहे, की डॉ.द.ता.भोसले यांच्या 'रामायण 'बसले' आहे!'या लेखातील लेखनातून ग्रामीण माणसांच्या धार्मिकतेचे स्वरूप लक्षात येते. पोथी लावणे म्हणजे काय, ते कळते. 'पंढरीची दिंडी' या लेखातून वारी म्हणजे काय, ते कळते. दिंडी म्हणजे काय, ते कळते.

डॉ. द.ता.भोसले यांचे गतकालीन जीवन आणि आजचे त्यांचे वर्तमानकालीन जीवन यांत खूपच अंतर आहे. ज्या जीवनवास्तवाचा एक भाग होऊन ते जगले, ते जीवनवास्तव आता धूसर होत आहे. काळाच्या पडद्याआड जात आहे. आणि कधी त्यांनी ज्याचे स्वप्नही पाहिले नव्हते, त्या प्रत्यक्ष वास्तवाचे भाग होऊन ते जगताहेत. खूप काही गमावलेल्या डॉ.द.ता.भोसले यांच्या हाती बरेच काही लागले आहे. दूरध्वनी, भ्रमणध्वनीसारख्या नव्या संशोधनाचे त्यांनी कधी स्वप्नही पाहिले नसावे. आज ते त्याचा उपयोग करून घेताहेत. पेट्रोल-डिझेलवर चालणाऱ्या वाहनातून प्रवास करताहेत. रेल्वेतून प्रवास करताहेत. आरोग्याच्यासंबंधीच्या नव्या संशोधनाचाही फायदा घेताहेत. पण त्याचबरोबर त्यांचे कालचे जगणे त्या जगण्यातल्या भोगण्यासह हरवलेले दुःखही ते वाहताहेत. असे जीवन जगणारे ते एकटे नाहीत. त्यांच्या वयातील अनेक माणसे आहेत. की ज्यांना आपण आपल्या पूर्वजीवनातले जे हरवलोत त्याचे दुःख मानायचे, की नवीन जे काही आपल्या हाती लागले त्याचा आनंद व्यक्त करायचा, याचा निर्णय घेणेही जमत नाही. काय चांगले, काय वाईट, हेही ठरवता येत नाही. अशी ही अवस्था प्रत्येकच पिढीच्या वाट्याला येत असते. असाच हा मानवी जीवनाचा प्रवास सुरू असतो. हा मानवी जीवनाचा इतिहास पुढच्या पिढीपर्यंत पोचवणे त्या त्या पिढीचे काम असते. आणि तसा इतिहास पुढच्या पिढीपर्यंत पोचवायचा असेल तर प्रत्येक पिढीतल्या माणसांनी चित्र--शिल्प-साहित्यादींच्या माध्यमातून आपल्या जीवनाचा इतिहास रेखाटला पाहिजे. डॉ.द.ता.भोसले लेखनाच्या माध्यमातून आपल्या पिढीचा इतिहास मांडताहेत, हे नीट लक्षात घेतल्यास त्यांच्या या लेखनाचे महत्त्व कळेल.

डॉ.द.ता.भोसले यांनी विविध साहित्यप्रकारांत लेखन केले आहे. आणि ते सर्वच लेखन अतिशय महत्त्वाचे आहे. मराठी साहित्यव्यवहार अधिक समृद्ध करणारे आहे. लोकसंस्कृतीच्या रंगरूपाची अक्षरनोंद करणारे आणि त्या व्यवस्थेचे वस्तुनिष्ठ विश्लेषण करणारे हे लेखन महत्त्वाचे आहे. लोकसंस्कृतीचे चांगलेपण आणि वाईटपण आपल्या समोर मांडणारे आहे. तत्कालीन लोकधारणेच्या पाठीमागील कारणांचा शोध घेणारे हे लेखन अत्यंत महत्त्वाचे असून महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास समजून घेण्यासाठी हे लेखन अत्यंत उपयोगाचे ठरते. लोकसंस्कृतीच्या रंगरूपाचा आणि प्रवासाचा इतिहास लिहिण्यासाठी डॉ.द.ता.भोसले यांचे हे लेखन माध्यमाच्या स्वरूपात उपयोगीचे ठरणारे आहे. ज्या व्यवस्थेचा भाग होऊन ते जगले, त्या व्यवस्थेच्या गुंतागुंतीच्या स्वरूपाची त्यांना चांगली माहिती असून त्यांनी केलेले हे लेखन अत्यंत विश्वासार्ह आहे. हे लेखन एका जाणकार आणि चिंतनशील लेखकाने केलेले आहे. आणि म्हणून ते जसे कलात्मक आहे, तसेच ते विचारगर्भही आहे. लोकसंस्कृतीत मानवी जीवनाला उपयुक्त ज्ञान-व्यवहार आणि मूल्ये लपलेली असतात. आणि ते जीवनोपयोगी ज्ञान-व्यवहार आणि मूल्ये नीट समजून घेण्याच्या दृष्टीने हे लेखम महत्त्वाचे ठरते.

---


या लेखात संदर्भ असलेली डॉ.द.ता.भोसले यांची पुस्तके-

१. भोसले, डॉ.द.ता., ग्रामीण बोलीचा शब्दकोश, पद्मगंधा प्रकाशन, पुणे ३८, २०१०

२.— परिघावरची माणसं, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद ०३, २००७

३.— लोकसंस्कृती : स्वरूप आणि विशेष, पद्मगंधा प्रकाशन, पुणे ३८, २००४











४.— लोकसंस्कृती : बंध-अनुबंध पद्मगंधा प्रकाशन, पुणे ३८, २०१०

— संस्कृतीच्या पाऊलखुणा, पद्मगंधा प्रकाशन, पुणे ३८, २००८

★★★

# मानवी मैला हाताने उचलण्याची कुप्रथा : मानवी हक्काला आव्हान

रामकिशन मांजरे

केंद्रातील सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय आणि महाराष्ट्र शासनाचा सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभाग यांच्या वतीने, मानवी मैला हाताने साफ करणाऱ्या सफाई-कामगारांचे सर्वेक्षण केले जात आहे. सर्वेक्षण कार्यक्रमाचे प्रशिक्षण देण्यासाठी केंद्र सरकारने राज्यातून सात अधिकाऱ्यांची मास्टर ट्रेनर म्हणून निवड केली आहे. नाशिक विभागात प्रशिक्षण वर्गास सुरुवात केली गेली आहे.माहिती समाजकल्याण विभागाचे प्रादेशिक आयुक्त राजेन्द्र कलाल यांच्या मते, "राष्ट्रीय जनगणनेत राज्यातील २५६ शहरांत उघड्या नालीत शौचालयाचे पाणी सोडलेले आढळून आले असून त्याची सफाई कामगार हाताने करत असल्याची माहिती आहे." या सर्वेक्षणाच्या माध्यमातून सर्वेक्षण केले जाणार असून, सफाईकामगारांचे पुनर्वसन करण्याचा हेतू आहे. यापूर्वीही 'सत्यमेव जयते' हा कार्यक्रम आठवत असेल, तर या कार्यक्रमात अमीर खानने मानवी मैला हाताने साफ करणाऱ्या कुप्रथेला सर्व जगाच्या समोर दाखविण्याचे महत्त्वपूर्ण काम केल्याचे लक्षात येईल. या निमित्ताने हाताने मैला साफ करणाऱ्या कामगारांचे जीवन, त्यांचे मानवी हक्क व सरकारची धोरणे यांबाबत चर्चा करणे आवश्यक वाटले, म्हणून हा लेख लिहिण्याची उठाठेव केली आहे.

प्रतिष्ठा आणि अस्मिता हे मानवी हक्कांचे अभिन्न अंग असून, ते स्वातंत्र्याबरोबरच सामाजिक न्याय आणि समाजात शांतता प्रस्थापित करण्यासाठी महत्त्वाचे कार्य पार पाडत असते. या व्यापक उद्देशाच्या पूर्ततेसाठी आपली संसदीय कार्यप्रणाली व न्यायपालिका निरंतर कार्यरत आहेत. स्वतःला नागरी समाज म्हणविणाऱ्या समाजात आजही मानवी मैला हाताने उचलण्याची कुप्रथा अस्तित्वात असून ती मानवतेला काळिमा फासणारी व शरमेने मान खाली करावयास लावणारी आहे.जगात प्राचीन पद्धतीची कोरडी शौचालये नष्ट केली जात आहेत; किंवा केली आहेत, पण भारतात कोणत्याही रेल्वे लाइनवर मैला पडलेला दिसून येतो. एवढेच नाही, काही रेल्वे स्थानकांवर थांबणे शक्य होत नाही. अनेक रस्त्यांच्या कडा, गल्ल्या आणि नाल्या शौचालयाची ठिकाणे बनली आहेत. मानवी मैला संक्रामक रोगांचे प्रमुख साधन मानले जाते. 'शायनिंग इंडिया' चा नारा देणाऱ्यांना निवडणुकीत हारवून 'आम आदमी' चा विकास संकल्पना घेऊन येणाऱ्या सरकारनेदेखील या प्रथेकडे दुर्लक्षच केलेले आहे. भारताच्या स्वातंत्र्याला सहा दशके झाली आहेत; तरी पण मानवी मैला नष्ट करण्याची वैज्ञानिक व कुशल अशी पद्धती आपण निर्माण करू शकलो नाही. 'इंडिया स्टिंकिंग' नावाचा ग्रंथ गीता राणी यांनी २००६ मध्ये लिहिला आहे, त्यांच्या म्हणण्यानुसार भारतातील ५० टक्के गरीब लोक कोरड्या शौचालयाचा वापर करतात, तर जवळजवळ ७० टक्के लोक सार्वजनिक शौचालयाचा वापर करतात. ग्रामीण भागात महाराष्ट्र सरकारने ग्रामस्वच्छता अभियानांतर्गत पाणंदमुक्त गावाची संकल्पना राबविली असली तरी किती गावे पाणंदमुक्त झाली, हा संशोधनाचा विषय आहे.

भारतात हाताने मानवी मैला उचलणाऱ्यांची संख्या ५.८ लाखांवरून वाढून ती ७.७ लाख झाली आहे. अनौपचारिक सर्वेक्षणातून असे दिसून आले आहे, की जवळजवळ १२ लाखापेक्षा जास्त लोक अशा प्रकारच्या कार्यात आहेत. यातील ९५ टक्के दलित आहेत, त्यांचे हे परंपरागत कार्य आहे. सरकारी आकडेवारीनुसार भारतात एक लाख लोक या कार्यात आहेत. दुर्दैव म्हणजे यात अधिकांश स्त्रिया आहेत. खाजगी आणि सार्वजनिक शौचालये, खुल्या नाल्या साफ करण्याचे काम एक पत्र्याची प्लेट व झाडू घेऊन त्या करीत असतात. अशाच पद्धतीने रेल्वे लाइनवरील मैला उचलण्याचे काम तर अतिशय घृणित करणारेच असते. लाइनवर पडलेला मैला झाडूने,






पत्र्याच्या प्लेटवर घेऊन तो एका टोपलीत गोळा करायचा आणि ती टोपली डोक्यावर घेऊन बाहेर एक ते दोन किलोमीटरवर टाकून द्यायचा, असे काम ते/त्या करीत असतात.

सफाई कामगार संघटनेचे समन्वयक वेजवाडा विल्सन यांनी कर्नाटकातील कोलार या शहरात सफाई कामगारांच्या आंदोलनास सुरुवात केली होती. या आंदोलनास देशातून सफाई कामगारांचा मोठा प्रतिसाद मिळाल्यामुळे भारतात सरकारने १९९३ मध्ये मानवी मैला उचलण्यासाठी कामावर ठेवण्यासाठी प्रतिबंध घालणारा कायदा केला. या कायद्यात कोरड्या शौचालयाचा निषेध केला होता. या कायद्यान्वये व्यक्तीला मानवी मैला उचलण्यासाठी कामावर ठेवणे कायद्याचे उल्लंघन मानले जाते. मानवी हक्क आयोग व उच्च न्यायालयाने वेळोवेळी हस्तक्षेप करूनसुद्धा या कुप्रथेचा अंत झालेला नाही. म्हणजेच कायदा कमकुवत पडला व राज्य व केंद्र शासन उदासीन बनले आहे.

**इतिहासातून कुप्रथा :**

भारतात नगर नियोजनाच्या विषयाला एक इतिहास आहे. अनेक इतिहासकारांनी भारताच्या शहरी संस्कृतीचा अभ्यास केला. त्यांच्या अभ्यासातून असे स्पष्ट होते, की सिंधू व रावी नदीच्या तटावर वसलेल्या मोहोंजोदारो आणि हडप्पा या दोन शहरांतील घरांमध्ये भूमिगत जल - निष्कासनाच्या सोयी होत्या. गुजरातमधील लोथलमध्ये हडप्पा सभ्यतेची अनेक उदाहरणे मिळाली आहेत. मिळालेल्या अवशेषांनुसार असे लक्षात येते की, त्या काळातील घरांत स्नानगृह व भूमिगत नाल्यांची व्यवस्था होती. पण हडप्पा सभ्यतेच्या अंताबरोबरच त्या व्यवस्थेचाही शेवट झाला. मध्यकाळात मानवी मैला हाताने उचलण्याच्या प्रथेत विशेष बदल झालेला दिसून येत नाही. ब्रिटिशांच्या काळात ही प्रथा सुरू ठेवली गेली. सैनिकांच्या छावणीमध्ये आणि नगरपालिकांमध्ये या अवमानजनक काम करण्याच्या प्रथेला सुव्यवस्थित रूप देण्यात आले. ब्रिटिशांच्या काळात विविध संस्था उदा. रेल्वे, न्यायालय, मोठी शहरे, उद्योगांत कोरड्या शौचालयाचाच वापर केला जात असे.

स्वातंत्र्याच्या चळवळीच्या काळात डॉ.बाबासाहेब आंबेडकर व महात्मा गांधी यांनी हाताने मानवी मैला उचलण्याच्या या वाईट प्रथेकडे लक्ष वेधले होते. त्यांनी या प्रथेस अतिशय वाईट मानून, आपल्या समाज सुधारणेच्या कार्यक्रमातील मुद्दा बनविला होता. हाताने मानवी मैला उचलणाऱ्या समुदायास (जातींना) दलितांमध्ये सर्वांत बहिष्कृत मानले जाते. जातवर्चस्ववादी मानसिकतेतून या बहिष्कृत जातींना अतिशय हीणकस वागणूक दिली जाते. त्यांचा पदोपदी अवमान केला जातो. भेदभावाच्या मानसिकतेतून त्यांच्यावर अत्याचार केले जातात. याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे महाराष्ट्रात सध्या गाजत असलेले व उच्च जातीच्या कसाई अत्याचाराला बळी पडलेले मेहतरकुटुंब होय. उत्तर प्रदेशात वाल्मीकी समाजावर अनेक प्रकारचे अत्याचार होतात. त्यांच्या आयाबहिणींची अब्रू लूटली जाते. भारतात अशा जातींची भंगी, वाल्मीकी, मेहतर, लालबेगी, चुहाटा, मीरा इ. नावांनी ओळख करून दिली जाते. त्यांची जनगणना वेगळी न करता अनुसूचित जातींच्या संख्येतच त्यांना मोजले जाते.

स्वातंत्र्यानंतर या कुप्रथेला संपविण्यासाठी केंद्रातील समाजकल्याण विभागाने प्रो.एन.आर.मलकानी यांच्या अध्यक्षतेखाली (१९६५) एका समितीचे गठण केले होते. समितीने या प्रथेच्या निर्मूलनासाठी व्यावहारिक कार्यक्रमाचा शोध घेतला होता. पण या समितीच्या शिफारशीवर राज्य वा केंद्र सरकारने कोणतीही कार्यवाही केली नाही. यानंतर राष्ट्रीय श्रम आयोगाची स्थापना श्री. भानूप्रसाद पांड्या यांच्या अध्यक्षतेखाली केली होती. त्यांनी काही उपाय सांगितले, पण पुढे त्या उपायांचीही दखल सरकारला घ्यावी वाटली नाही.

घृणित कार्यात असलेल्या लोकांचे जीवनमान सुधारण्यासाठी योजना आयोगाने तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत १ करोड चव्वेचाळीस लाख रुपये, चौथ्या पंचवार्षिक योजनेत ३ करोड, पाचव्या योजनेत ४ करोड ४० लाख रुपयांची व्यवस्था केली होती. सहाव्या योजनाकाळात 'भंगी मुक्ती योजना' राबविली. या योजनेचे उद्दिष्ट शहरातील सार्वजनिक / सामुदायिक व कोरडी

शौचालये नष्ट करून प्रत्यक्ष शौचालयाची निर्मिती करणे होते. याच काळात १९८०-८१ मध्ये गृहमंत्रालयाने परंपरेने मानवी मैला साफ करणाऱ्याच्या व त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्तीच्या स्थितीत सुधारणा करण्यासाठी व पुनर्वसन करण्यासाठी कार्यक्रम आखले होते. १९९१ मध्ये योजना आयोगाने या कुप्रथेतून कर्मचाऱ्यांच्या मुक्तीसाठी विचार केला आणि हे मुक्तीचे काम नगर विकास मंत्रालयाकडे सोपविले. १९९२ मध्ये समाज कल्याण मंत्रालयाने पुन्हा या लोकांच्या पुनर्वसनाचे कार्य हाती घेतले. त्यानंतर १९९३ मध्ये सफाई कर्मचारी नियोजन आणि कोरडे शौचालय (प्रतिबंध) कायदा अमलात आला.

अकराव्या पंचवार्षिक योजनेत मुख्यतः दलित समुदायातील हाताने मैला उचलण्याच्या प्रथेच्या निर्मूलनासाठी विशेष लक्ष दिले होते. परंतु या प्रथेला २०११ ( ही निर्धारित वेळ होती) पर्यंत उखडून टाकण्यात अपयश आल्याने पुनः बाराव्या योजनेत या कुप्रथेला पूर्णतः संपुष्टात आणण्यासाठी प्रयत्न केले जात आहेत.

भारत सरकारच्या सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालयाच्या (२०१०-११) वार्षिक अहवालानुसार भारतातील कोरड्या शौचालयांची संख्या २,४०,७९७ आहे. यात सर्वात जास्त संख्या उत्तर प्रदेशात आहे.

**भारतीय राज्यघटनेतील मानवी हक्क**

डॉ.बाबासाहेब आंबेडकरांनी राज्यघटनेच्या प्रस्तावनेतच मानवी हक्काची व्यापक संकल्पना मांडली आहे. भारतातील प्रत्येक नागरिकास सामाजिक, आर्थिक व राजकीय हक्क व न्याय सुनिश्चित केला आहे. सामाजिक न्यायाच्या संकल्पनेस राज्यघटनेत मूलभूत हक्क व अधिकाराच्या रूपात स्वीकृत केलेले दिसून येते. राज्यघटनेच्या कलम १४,१७,१९ व २१ मध्ये नागरिकांच्या मूलभूत हक्कांचे संरक्षण करण्यात आले आहे.कलम २१ नुसार जीवित व व्यक्तिमत्त्वस्वातंत्र्य यांचे संरक्षण केले आहे. या कलमान्वये मानवी हक्कांच्या स्वरूपांचे संरक्षण केले जाते. कलम २३ अनुसार माणसांचा अपव्यापार आणि वेठबिगार यांना मनाई आहे. सार्वजनिक प्रयोजनाकरिता सेवा करावयाला लावण्यास राज्याला प्रतिबंध केला जाणार नाही. पण केवळ धर्म, वंश, जात वा वर्गाच्या आधारावर राज्य कोणताही भेदभाव करणार नाही. तसेच राज्यघटनेच्या ३२ आणि २२६ कलमांन्वये मूलभूत हक्कांच्या उल्लंघनासंबंधी संरक्षणाची तरतूद करण्यात आली आहे.

मानवी मैला हाताने उचलण्याच्या प्रथेस प्रतिबंध करण्यासाठी किंवा तिचे समूळ उच्चाटन करण्यासाठी कायद्याची निर्मिती केली आहे. त्यात Employment of Manual Scavengers and constructions of dry latrines (prohibition) Act. १९९३ हा महत्त्वाचा आहे. या कायद्याचा मूळ उद्देश म्हणजे मानवी मैला उचलण्यास कामावर ठेवण्यास प्रतिबंध करणे व कोरड्या शौचालयाच्या निर्मितीवर बंधन टाकणे आहे. हा कायदा ५ जून १९९३ पासून अमलात आला. आंध्रप्रदेश, गोवा, कर्नाटक, महाराष्ट्र, पश्चिम बंगाल, त्रिपुरा आदी राज्यांनी आणि केंद्रशासित प्रदेशांनी २६ जानेवारी १९९७ पासून उपरोक्त कायदा आपल्या राज्यात लागू केला आहे. या कायद्याचे उल्लंघन केल्यास एक वर्षापर्यंत कारावास किंवा दोन हजार रुपये दंड वा दोन्ही शिक्षा एकत्रित देण्याची तरतूद आहे. या कायद्याचे अपयश पाहता भारताच्या राष्ट्रपतींनी १२ मार्च २०१२ रोजी संसदेतील आपल्या अभिभाषणात सामाजिक न्यायाच्या दृष्टीने वचन दिले, की सरकार मानवी मैला हाताने उचलण्याच्या या कुप्रथेचे उच्चाटन करण्यासाठी नवे बिल संसदेत घेऊन येईल व त्यांच्या पुनर्वसनाची तरतूददेखील या बिलात असेल. प्रधानमंत्री डॉ.मनमोहनसिंगांनीदेखील २०१२ च्या स्वातंत्र्यदिनी आपल्या भाषणातून घोषणा केली, की हाताने मैला उचलण्याच्या या अतिशय वाईट प्रथेच्या निर्मूलनासाठी व संबंधित सफाई कामगारांच्या पुनर्वसनासाठी सरकार नव्या कायद्याची स्थापना करण्याचा विचार करीत आहे. केंद्र सरकारमधील तत्कालीन सामाजिक न्याय व सबलीकरण मंत्रालयाचे मंत्री मुकूल वासनीक यांनी 'The Prohibition of Employment and their Rehabilitation Bill, २०१३' लोकसभेत मांडले आहे. या बिलात नियमांचे उल्लंघन केल्यास दोन लाख रुपये दंड आणि दोन वर्षांचा तुरुंगवास, आणि याची पुनरावृत्ती झाल्यास पाच लाख रुपये दंड आणि पाच वर्षांचा तुरुंगवास अशी तरतूद असून हा गुन्हा दखलपात्र असेल. राष्ट्रीय सफाई आयोग या नियमांवर देखरेख ठेवणार








असून, जिल्हाधिकाऱ्यांनाही याबाबत देखरेखीचा अधिकार देण्यात आला आहे. याबरोबरच पूर्वीचे 'नागरी हक्क संरक्षण कायदा' (१९५५) व १९८९ चा 'अ‍ॅट्रॉसिटी अ‍ॅक्ट' आहेत.

योजना आयोगाने राष्ट्रीय कृती कार्यक्रम २००७ मध्ये आखला होता. त्यांनी NGOs ना सोबत घेण्याबरोबरच, १९९३ च्या कायद्याची कडक अंमल-बजावणी करणे व वित्तीय मंत्रालयाने या प्रथेच्या निर्मूलनासाठी राष्ट्रीयीकृत बँकांना लोन देण्याच्या उद्देशाला प्राधान्य दिले होते. म्हणून सरकारने SESRMS. TSC. Nirmal Gram Puraskar Yojna. NSLRS Pre matric Scholarships for the children. ILCS, NSKFDC अशा विविध कार्यक्रमांच्या माध्यमातून या प्रथेच्या उच्चाटनाचे कार्य चालू ठेवले आहे.

**राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाची भूमिका**

नवी दिल्ली येथे २८ ऑगस्ट २००८ रोजी राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने मानवी हक्कांच्या जाहीरनाम्यास साठ वर्षे पूर्ण झाल्याने एक चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्रात मानवी मैला हाताने उचलण्याच्या प्रथेला पूर्णत: प्रतिबंध करण्यासाठी शिफारशी केल्या आहेत. त्यांतील महत्त्वाच्या शिफारशी म्हणजे १) प्रत्येक तीन वर्षांनी सर्व्हे करणे. हे करताना NGOs ची मदत घेणे. २) जिल्हाधिकाऱ्यांनी एका नोडल अधिकाऱ्याची नियुक्ती करावी आणि त्या जिल्ह्याचे सर्वेक्षण करून कोरड्या शौचालयास प्रतिबंध घालावा, अशा घृणित कार्यात असणाऱ्या व्यक्तींचे पुनर्वसन करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी, या कामात हयगय करणाऱ्यावर निर्बंधनात्मक कार्यवाही करावी. ३) ज्या राज्यात वा क्षेत्रात पाण्याची कमतरता आहे, त्या ठिकाणी नवीन तंत्रज्ञान वा पद्धती पुरविल्या जाव्यात. नगरपालिका व पंचायतीने नवीन घर बांधण्याची परवानगी देत असताना फ्लश शौचालय बांधण्याची सक्ती करावी. ४) मानवी मैला उचलणाऱ्या कुटुंबाला बीपीएल कार्ड दिले पाहिजे. ५) बँकांनी अशा कुटुंबाला लोन देण्याची प्रक्रिया गुंतागुंतीची करू नये. ६) अशा लोकांची ओळख करून त्यांना विविध योजनांची माहिती द्यावी व त्यांना योजनांचा लाभ मिळवून देण्याचा प्रयत्न करावा. ७) राज्य मानवी हक्क आयोगाने या प्रथेचे निर्मूलन करण्यासाठी व संबंधितांचे पुनर्वसन करण्यासाठी प्रयत्न करायला हवेत.

**राष्ट्रीय सफाई कर्मचारी आयोगाचे प्रयत्न**

१२ ऑगस्ट १९९४ रोजी पहिल्या राष्ट्रीय सफाई कर्मचारी आयोगाची स्थापना केली गेली. त्यानंतर १९९७ मध्ये दुसऱ्या आणि फेब्रुवारी २००१ मध्ये तिसऱ्या आयोगाचे पुनर्गठन केले आहे. सफाई कर्मचाऱ्यांना सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी व संधीची असमानता दूर करण्यासाठी केंद्र सरकारला विविध कार्यक्रम राबविण्याची शिफारस करणे, या कर्मचाऱ्यांच्या सामाजिक व आर्थिक पुनर्वसनासाठी जे कार्यक्रम राबविले जातात त्यांचे मूल्यमापन करणे, विशेष अशा तक्रारींची शहानिशा करणे असे कार्य आयोगाद्वारे केले जाते. आयोगाचे अध्यक्ष न्या. ए.एस.आनंद यांनी २५ फेब्रुवारी २००६ रोजी केंद्र व राज्य सरकारच्या अधिकाऱ्यांच्या बैठकीत आपल्या भाषणात म्हटले, की सर्व राज्यांनी सहा महिन्यांचा काळ हे लक्ष्य ठेवून सर्व कोरड्या शौचालयांना प्रतिबंध घातला पाहिजे व ग्रामीण भागातील या प्रथेचे उच्चाटन करण्यासाठी व अशा समूहाचे पुनर्वसन करण्यासाठी राष्ट्रीय कार्य योजनेच्या अंतर्गत २००७ पर्यंतचा काळ निश्चित केला पाहिजे. आजपर्यंत केवळ नागालँड, गोवा, मेघालय, मिझोराम, दादरा आणि नगरहवेली , लक्षद्वीप आणि पाँडेचेरी, चंदीगड या राज्य वा केंद्रशासित प्रदेशांनीच या प्रथेपासून मुक्ती मिळविली आहे. पण महाराष्ट्रा-सारख्या पुरोगामित्वाचे वाद्य वाजवणाऱ्या राज्याबरोबरच गुजरात, आंध्रप्रदेश, कर्नाटक या सर्व राज्यांत ही प्रथा अस्तित्वात आहे.

**न्यायालयाचा दृष्टिकोण**

१९९६ पासून वेळोवळी विभिन्न वादांमध्ये उच्च न्यायालयाने राज्यघटनेचे कलम १४,१७,१९ आणि २१ यांचे विश्लेषण करून जीवन जगण्याच्या अधिकारांना व्यापक रूप दिले आहे. प्रथमच २००३ मध्ये सफाई कर्मचारी आणि सहा अन्य संघटनांनी या कुप्रथेला वाचा फोडण्यासाठी उच्च न्यायालयात जनहितयाचिका दाखल केली होती. यावर निकाल देताना उच्च न्यायालयाने केंद्र व राज्य सरकारला असे निर्देश दिले, की एका निश्चित काळात या कुप्रथेचे उच्चाटन करण्यासाठी संबधित








कायद्याची कडक अंमलबजावणी करावी व त्या समूहाचे पुनर्वसन व रोजगाराच्या संधी उपलब्ध करून देण्यासाठी कार्यक्रम राबवावेत. २००६ मध्येच 'पीपल्स युनियन फॉर सिविल लिबर्टीज' या संघटनेने जनहित याचिका दाखल केली होती, त्यावर निर्णय देताना उच्च न्यायालयाने मानवी मैला हाताने उचलण्याच्या या कुप्रथेवर चिंता व्यक्त करून सहा महिन्यांच्या आत या प्रथेचे उच्चाटन करण्यास सांगितले होते. न्यायमूर्ती एस.एन.वैटीयावा आणि न्या.एच.के.सेना यांच्या पीठाने, सफाई कर्मचारी संघटनांच्या प्रार्थनापत्रावर आदेश दिला, की १९९३ चा कायदा असूनसुद्धा जर ही प्रथा समाजात असेल, तर राज्यांनी शेवटची संधी म्हणून त्यांनी केलेले निर्मूलनाचे प्रयत्न व पुनर्वसनाच्या योजनांसंबंधी शपथपत्र दाखल करावे. हे शपथपत्र या विषयावर जिम्मेदारीने निर्णय घेणाऱ्या व्यक्तीकडूनच दाखल केले जावे.

**या कुप्रथेचे उच्चाटन होईल का?**

राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने २१ ऑगस्ट २०११ रोजी प्रसारमाध्यमातील बातम्यांचा आधार घेऊन स्वत: कर्नाटक राज्य सरकारला नोटीस पाठवून म्हटले होते, की राज्यात जवळजवळ ८००० (आठ हजार) व्यक्ती या कार्यात सहभागी आहेत. आणि हे रिपोर्ट खरे असतील तर मानवी हक्काचे हनन होत आहे. राज्याच्या मुख्य सचिवाला निर्देश दिले की, चार आठवड्यांच्या आत उत्तर देणे आवश्यक आहे. राज्यातील ज्या जिल्ह्यांत ही कुप्रथा अस्तित्वात आहे, त्या जिल्ह्यांत या प्रथेचे उच्चाटन करण्यासाठी सरकारने काय प्रयत्न केले आहेत, याचीही माहिती आयोगाला देणे बंधनकारक आहे. विधी आयोगाचे अध्यक्ष न्या. ए.आर.लक्ष्मण यांनीदेखील केंद्रसरकारला पत्र लिहून केंद्रसरकारने या प्रथेच्या निर्मूलनासाठी राज्य सरकारला निर्देश द्यावेत, असे म्हटले होते. २००८ मध्ये आयोगाने तत्कालीन सामाजिक न्यायमंत्री मीरा कुमार यांना पत्र लिहून म्हटले होते, की सफाई कामगार संघटनेच्या अहवालानुसार देशात १३ लाख लोक मानवी मैला हाताने साफ करण्याच्या कार्यात आहेत. मागे म्हटल्याप्रमाणे 'सत्यमेव जयते' च्या कार्यक्रमात अमिरखानने हा मुद्दा पुन्हा एकदा देशपातळीवर चर्चेस आणला आणि अनेक समाजसुधारक, मानवी हक्कांचे कार्यकर्ते त्यांनी त्यावर चर्चा केली. यातील बोलकी प्रतिक्रिया समाजशास्त्रज्ञ अभय कुमार दुबे यांनी दिली होती. त्यांच्या मते, "मानवी मैला हाताने उचलण्याच्या प्रथेला इतिहास असून, ग्रामीण भागापासून शहरापर्यंत या प्रथेची व्यापकता दिसून येते. या कार्यात अधिकतर दलित समाजातील व्यक्ती कार्यरत आहेत. या समाजाच्या उत्थानासाठी अनेक कायदे व धोरणे राबविली जात असली, तरी ही धोरणे व कायदे राबविणारे अधिकतर उच्च जातीतील आहेत. म्हणून उच्च जातिसमूहाकडून अपेक्षा न करता, धोरणे व कायद्याची कडक अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. तसेच केंद्र व राज्य सरकारने केवळ चर्चा व कागदावर योजनांना दाखविण्यापेक्षा ही कुप्रथा कशी नष्ट करता येईल, यासाठी प्रभावी कृतिकार्यक्रम राबविणे आवश्यक आहे."

ही कुप्रथा अधिकतर दलित समाजातील सर्वांत कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या जातीत अस्तित्वात आहे. भारतीय राज्यघटनेने जातिप्रथा नष्ट करण्यासाठी घटनात्मक तरतूद केली आहे. म्हणजेच ही प्रथा नष्ट करण्याचे दायित्व केंद्र व राज्य सरकारवर आहे. ही समस्यात्मक प्रथा मानवी हक्क आयोगाच्या विविध संस्थांनादेखील एक आव्हानच आहे. यासाठी आयोगानेदेखील या प्रथेला एका विशिष्ट जातीच्या नजरेतून न बघता संपूर्ण समाजाला लागलेला कलंक म्हणून पाहिले पाहिजे. यासाठी विविध कार्यक्रम व योजनांसोबतच समाजातील उच्च जातींची मानसिकता बदलण्यासाठी कार्यक्रम हाती घेतले पाहिजेत; तेव्हाच राज्यघटनेतील व मानवी हक्क आयोगाच्या मूलभूत उद्देशांना प्राप्त करता येईल.

**संदर्भ :**

१) शर्मा, कृष्णकुमार (२०१२) मानवाधिकार एवं दलित चेतना. नई दिल्ली : अर्जुन पब्लिशिंग हाऊस.

२)Sri Krishna & Sumudrala (ed.). Dalits and Human Rights : New Delhi, Serials Publications

३) दुबे, अभयकुमार (सं.) (२००५) आधुनिकता के आईने में दलित, नई दिल्ली : वाणी प्रकाशन.

४)Rehman, Kanta. (2011) Human Rights : Concepts and Issues, Delhi : Commonwealth










Publishers Pvt.Ltd.
५) सबनीस, श्री.ना.(२०१२) मानवी हक्क संरक्षण : ठाणे, मुकुंद प्रकाशन.
६) वार्षिक रिपोर्ट, सामाजिक न्याय एवं अधिकारिता मंत्रालय , भारत सरकार, २०१०-११.
७) Swami. Geetarani.(2006). India stiking : Manual Scavengers in Andhra Pradesh and their works. Pondicheri : Narayan Publishing.
८) Know your rights series : Human Rights and Manual Scavenging. 2011. National Human Rights Commission.
९) दैनिक लोकसत्ता, २७ मार्च २०१३.

★★★

## लेखकांचा परिचय

❋ **श्री. बाबुराव चंदावार**
समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक.
***पत्ता :*** सईनगर २, डी, फ्लॅट-१३, सिंहगडरोड, पुणे-४११०३०. दूरध्वनी: ०२०-२४५०६९३.

❋ **प्रा. डॉ. भगवान माने**
फ्रीलान्स जर्नालिस्ट. योजना मासिक, सुगावा, अस्मितादर्शन, विचारमंथन इत्यादी मासिकांमधून लेख प्रसिद्ध. राज्य व राष्ट्रीय स्तरावर शोधनिबंध वाचन. भारतीय संविधानाचा विशेष अभ्यास. महाराष्ट्र व लोकप्रशासन परिषदेचे कार्यकारिणीसदस्य.
***पत्ता :*** असोसिएट प्रोफेसर, राज्यशास्त्र विभागप्रमुख, जयसिंगपूर, ता. शिरोळ,
जि. कोल्हापूर – ४१६ १०१. भ्रमणध्वनी : ९८२३८४५१४१.

❋ **सौ. स्मिता नितीन लाळे**
सायकॉलॉजीतून बी. ए. द. भि. कुलकर्णीवरील गौरवग्रंथ सदरामधून कवितांवरील लेख मागील वर्षांपर्यंत प्रसिद्ध. दिवाळी अंकांतूनही लेख प्रसिद्ध होतात.
***पत्ता :*** डी/३०१ वसुधा, डी. एस. के. विश्व, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे ४११ ०४१.
दूरध्वनी : ८८०५५६४७३९.

❋ **प्रा. माधव पुटवाड**
राष्ट्रसंत गाडगे महाराज अमरावती विद्यापीठ येथील मराठी विभागात प्राध्यापक.
***पत्ता :–*** १२३, जिजाऊ नगर (गणोरकर ले-आउट),राजुरा नाका, अमरावती.
भ्रमणध्वनी : ९४२३७५०६०२.

❋ **प्रा. रामकिशन मांजरे**
समाजशास्त्र विभागप्रमुख, शिवाजी महाविद्यालय, उदगीर.
***पत्ता :–*** शिवाजी महाविद्यालय, उदगीर.

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून
सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई